# स्त्रियांकरितां गाण्यांचें पुस्तक.



## भाग पहिला

हें पुस्तक

नारायण रामचंद्र सोहनी.

व

जनार्दन महादेव गुर्जर.

ह्यांनीं

मोठ्या प्रयत्नानें तयार केलें तें

मुंबईंत

जगदीश्वर छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति पहिली.

शाके १८००

सन १८७८ इ०



किम्मत १० आणे.

# प्रस्तावना.



आलीकडे मोठमोठ्या शहरांतून सरकारच्याव कित्येक विद्वान् सद्गृहस्थांच्या मदतीनें मुलींच्या शाळा बऱ्याच स्थापन झाल्या आहेत. ह्यामुळें बहुत स्त्रियांस वाचतां येऊं लागलें आहे. व पुढेंही असा क्रम चालू आहे. ह्मणून स्त्रियांस अनेकप्रकारचीं पुस्तकें वाचण्याची गोडी लागली आहे तथापि त्यांस मुख्यत्वें करून नानाप्रकारचीं देवादिकांचीं गाणीं पाठ करून आपल्या बरोबरीच्या स्त्रीसमाजांत क्रीडार्थ व भूषणार्थ ह्मणण्याची फार हौस असते-खरी परंतु त्यांस अद्याप गाण्यांच्या पुस्तकांची मदत व्हावी तशी झाली नाहीं ह्या हेतूस्तव आम्ही मोठ्या प्रयत्नानें कित्येक सभ्य व प्रौढ स्त्रियां पासून नानाप्रकारचीं देवादिकांचीं सुबोध गाणीं मिळवून ह्यांचे दोन भाग केले आहेत. त्यांत पहिल्यानें गाणें लिहून त्यांतील कित्येक कठीण शब्दांवर टीपा दिल्या आहेत व गाण्यांच्या शेवटीं तात्पर्य ह्या नांवानें गाण्यांतील कथाभाग मुद्यासह चांगला

लिहिला आहे. पुस्तकाच्या शेवटीं चमत्कारिक ह्मणी व मनोरंजक उखाणे लिहिले आहेत.

ह्या दोन भागांचा चांगला खप झाल्यास पुढें तिसरा भाग छापण्याची आमची इच्छा आहे.

पुस्तककर्ते.

# अनुक्रमणिका.


| गाणें. | | पृष्ठ. | गाणें. | | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|---|
| १ | गणपतीचें | १ | १६ | कालियामर्दन | ४० |
| २ | दुष्टगणपतीची | २ | १७ | तुळशीदास | ४५ |
| ३ | त्रिंबकराज | ३ | १८ | रंग | ५१ |
| ४ | अभिमन्यु | ५ | १९ | वेणी | ५४ |
| ५ | रंभा | १२ | २० | वनवासी राम | ५५ |
| ६ | जिवाजीपाटील | १३ | २१ | चोळी | ५८ |
| ७ | जहाज | १६ | २२ | मुरली | ६२ |
| ८ | चेंडू | १८ | २३ | कृष्णजन्म | ६४ |
| ९ | कृष्णाचें | २४ | २४ | काशीखंड | ६७ |
| १० | जग किंवा देखत भूल | २५ | २५ | रुक्मिणीस्वयंवर | ७१ |
| | | | २६ | हरतालिका | ७५ |
| ११ | लंका | २९ | २७ | नाच कृष्णाचा | ८२ |
| १२ | केशव | ३२ | २८ | अनसूया | ८६ |
| १३ | धांवा द्रौपदीचा | ३४ | २९ | त्रिवेणी | ९२ |
| १४ | बुडबुडा | ३६ | ३० | बेलबाग | ९४ |
| १५ | त्रिजटा | ३८ | ३१ | योगी | ९८ |

# अनुक्रमणिका.


गाणें — पृष्ठ.

३२ शांभवी...... १०१

३३ धांवा द्रौपदीचा १०४

३४ बोध......... १०८

३५ सीतास्वयंवर.. ११०

३६ विराधराक्षस ११५

३७ चुटका..... ११८

३८ फूलपारिजातकाचें १२०

३९ राधा व तिचे सखीचा संवाद.. १२६

४० कृष्णाचा व सख्याचा संवाद १२८

४१ जानकी लोपामुद्रासंवाद..... १३०

४२ रामचरित्र.... १३४

आरती मंगलागौरीची..... १३९

मनोरंजक उखाणे........ १४१




# स्त्रियांकरितां गाण्यांचें पुस्तक.

## भाग १ ला.



### गाणें. १ लें. गणपतिचें.

मंगळ मूर्ती तुज स्मरतां विघ्नें हरति रे. तुज स्म० ॥ धृ० ॥ तुजला घालुन मंगळ स्नान, तुजला घालुन मंगळ स्नान पिंवळा पीतांबर नेसवून पिंवळा० ॥ रत्नजडित मुकुट शोभे वरती ॥ मंगळ मूर्त्ती तुज स्मरतां विघ्नें हरति ॥ १ ॥ गुण देई माझ्या बाळाला ग गुणदेई० मंगळ मूर्ति तु० ॥ २ ॥ लाडू मोदक पक्वान्नें ॥ वर शर्करामृत अर्पून ॥ धूप दीप सुवर्ण दक्षिणा, वाहिली वरती मंगळ मू० ॥ ३ ॥ गुण देई माझ्या बाळाला ग गुण देई० तुझ्या करीन संकटचवती ॥ मंगळ मूर्ति तुज स्मरतां विघ्नें हरति रे, तुज स्म० ॥ ४ ॥ ॥

गाणें २ रें, दृष्ट गणपतिची.

मुकुट मनहार शोभतो भाळीं॥ केशर कस्तुरी लाविली कपाळीं शिरपेंच तुरा शोभे त्याही जवळी॥ शेला पितांबर लोळत चरणीं॥ दृष्ट उतरा तुह्मि ग साजणी लोण उतरा तुह्मी ग साजणी हेरंब सखया पहा ग नयनीं गणपति सखया पहा ग नयनीं॥१॥ जळो जळो दृष्ट ग कोठें झाली याला॥ अवतार घेउनि खेळे बाळलीला॥ गळां मुक्तहार शोभतो मणि॥ दृष्ट उतरा तुह्मी ग साजणी॥ लोण उतरा॥२॥ काक्रोध लोभ मिर्च्या मोहऱ्या हातीं उज्ञान मनिंच्या कल्पना करा याची मा॥ उतरोनि काढा टाका अग्नि मूखीं प्रेम अश्रु तुह्मी शिंपडा हो पाणी॥ नयन अश्रु तुह्मी शिंपडा ग पाणी दृष्ट उतरा तु० ॥३॥ ॥ ॥

गाणें. ३ रें, श्री त्रिंबकराज.

मुळगंगेचें[1] स्थान तेथें पंचतीर्थ[2] क-
रिती॥ नाग नरांबळिपासून त्यांचे
संमंध[3] दुर होती ॥ आठवे दिवशीं सो-
मवारीं स्वारी[4] कुशावर्तीं॥ मोठे मोठे
ब्राह्मण-योगी जपमाळा जपती॥ ध्व[5]
जापर्वीच्या संधीमध्यें गोसावी येती॥
खांदे-भाले-बर्च्या-चक्रें अपसामधिं
लढती॥ ब्रह्मगिरीचा अघटित महि-
मा भावानीं ग भजा ॥ १ ॥ चार प्र-
हर चौघडा झडतो त्रिकाळ शिवपू-
जा॥ त्रिंबकराजा महाराजा चला पा-
हूं तो राजा॥ अ० क०॥ उठून प्रातःका
ळीं गंगा-गोदावरि न्हालें॥ गंधाक्षता-
बेलपत्रीं देवळांत गेलें॥ पूजन करु-

---

१ मूळ गंगा ही ब्रह्मगिरीपासून निघालेली नदी. २ गंगाद्वार, कुशावर्त, बिल्वक, नीलपर्वत, आणि कनखल, हीं मुख्य पांच तीर्थें आहेत. ३ पिशाचबाधा. ४ श्रीत्रिंबकेश्वरमहाराजांची स्वारी कुशावर्त तीर्थावर स्नानास येत असते. ५ सिंहस्थाच्या आरंभीं तेथें ध्वजा लावतात तें पर्व.

नी सांबसदाशिव मनीं आराधीलें॥वंद
न करुनी भावें वरतीं वटदर्शन केलें॥ सर-
स्वती पुढें पहातां दिसे रामाची ध्वजा॥
चार प्रहर०॥ २॥ धनुष्यधारी सिता
स्वयंवरीं फिरे तो वनवासी॥ अरण्या
मधें भक्षण करणें कंद-मुळें ज्यासी॥
आधींच रुततील खडे भूमीवर नाजू-
क चरणांसी॥ आनंद हृदयीं झाला
पावलें निर्मळ तीर्थाशीं॥ निर्मळ ती-
र्थावरुनि पहातां दिसे महा दरवाजा॥
चार प्रहर०॥ ३॥ वेतरणीचा उद्धर के-
ला त्या गौतमानीं॥ गौतम टाकुन पु-
ढें मिळालों तिसऱ्या योगानीं॥ नम-
स्कारिली ढवळी गंगा तिचें निर्मळ
पाणी॥ शाहा तीर्थापासुन दमलों भु-
जंगतीर्थानी॥ नारसिंह तो विराटरू-
पी सूर्याचे ध्यानीं॥ बारीमध्यें गजान-
न तो संकट नीवारी॥ त्रिंबकराजा म-
हाराजा अर्धांगीं गिरिजा, भोवानी बाळा

कवन केलें जय जय महाराजा ॥ चार प्रहर० ॥ ४ ॥

**तात्पर्य**- ह्या गाण्यांत श्रीत्र्यंबकेश्वराचें वर्णन केलें आहे. त्यांत कुशावर्ततीर्थावर रामाची स्वारी कधीं येत असते व ध्वजापर्वाचे संधीस काय चमत्कारिक मौज होते हें दर्शवून कांहीं त्या मार्गाचें वर्णन केलें आहे.

---

गाणें ४ थें. अभिमन्यु.

सकाळीं उठून, धर्मानीं काय केलें ॥ अभिमन्युला बोलावीलें ॥ समसप्तक, अर्जुनास दिधलें ॥ कौरवी सैन्य सिद्ध झालें ॥ दुर्योधनानीं, द्रोणाशीं पण केला ॥ धरुनी द्यावें धर्माला ॥ व्यूहभेदाची[1], युक्ति आहे तुजला ॥ बाळा जावें युद्धाला ॥ १ ॥ गेला आभिमन्यू, अभिमन्यु वीर रणीं[2] ॥ चक्रव्यूह केला द्रोणानीं ॥

१ एके प्रकारची सेनेची रचना आहे तिचा भेद करण्याची.
२ लढाईच्या जागीं.

अ० क० ॥ पुसूनि धर्माला, नमस्कार केला ॥ हाकामारी सारथ्याला[1] ॥ जोड रे घोडे, आपल्या रथाला ॥ धर्मानें आज्ञा दिलि माला ॥ सूत ह्मणे राजा, अपशकुन झाला ॥ सूर्यकां दक्षिणेस आला ॥ जाउनि रे मारीं, कौरवांच्या मुला ॥ नाहिं तर जन्म व्यर्थ गेला ॥ गेला० ॥ २ ॥ रथीं बैसला, उत्तरेचा पती ॥ मारिले दहासहस्र रथी ॥ हत्ती आणि घोडे, पायदळ कीती ॥ पाडिल्या लोथींच्या लोथी ॥ वीर वारंवार. गदायुद्ध करती ॥ झाली त्रैलोकीं ख्याती ॥ वय लाहान, तया नाहीं भीती ॥ जसा शोभला पशुपती[2] ॥ गेला० ॥ ३ ॥ रणीं मिसळला, सुभद्रेचा सूत ॥ सैन्य पाडिलें असंख्यात ॥ शिरानें शिर, कितीक उडवीत ॥ राजे झाले भयाभीत ॥ सोळावर्षांचें, वय दिसे लाहान ॥

---

१ सारथी. २ शंकर.

युद्ध ग केलें निर्वाण ॥ गेला० ॥ ४ ॥ मग दुर्योधन, रडत रडत आला ॥ मिठी घाली द्रोणाला ॥ पार्थपुत्रानें, फार प्रळय केला ॥ हटविली माझी सर्व सेना ॥ तुह्मीं कां युद्ध, मनापासून कराना ॥ कसें रक्षितां पांडवांनां ॥ ईकडे पाहून, सांगे कर्णाला ॥ शकुनीमामा पळून गेला ॥ गेला० ॥ ५ ॥ घ्या घ्या ह्मणूनी, विभूमधें[1] गेला ॥ जयद्रथाला क्रोध आला ॥ द्रोणादिक शत्रू, दारीं उभा केला ॥ फितूर सैन्यामधीं केला ॥ त्याच्या पाठीशीं, येऊं देईना कोणा ॥ तळमळ स्फुटली भीमसेना ॥ सांबप्रसादें, ते दिवशीं जय त्यांना ॥ बळें हटविलें पांडवांनां ॥ गेला० ॥ ६ ॥ प्रथम द्रोणानें, तोडीलें धनुष्य ॥ फोडिलें अंगाचें कवच ॥ मोडिला रथ, मग झाला विरथ ॥ धां

---

१ चिलखत.

उर्नी आला जयद्रथ ॥ बाळ घावरलें,
चोहोंकडे पाहे ॥ ह्मणे हें धर्मयुद्ध नोहे
॥७॥ पडला अभिमन्यू, अभिमन्यु वीर
रणीं ॥ शोक बहू केला पांडवांनीं ॥ अ०
क०॥ इकडे कीरीटी, ह्मणे केशवाला
॥ अपशकुन होति माला ॥ मृगांचा क-
ळप, सव्य होतीं गेला ॥ लवतो माझा
वाम डोळा ॥ माला वाटतें, कोणी वीर
पडला ॥ माझा धर्म धरून नेला ॥ चा-
ल रे देवा, जाउं शिबीराला ॥ कळेल
तयीं वर्तमान माला ॥ पडला० ॥८॥
कृष्णा-अर्जुन, शिबिरांत आले ॥ राजे
अधोमुखीं बसले ॥ पुसे भीमाला,
बाळ कुठे गेला ॥ हकुच सांगे रणीं
पडला ॥ अहारे देवा, कसा घाला प-
डला ॥ हिरा पदरींचा सुटुन पडला ॥
अहा रे देवा, कसा घाला पडला ॥ र-
णाचे तोंडीं बाळ दीला ॥ पुत्र हा योगी,

१ अर्जुन. २ उजव्या. ३ डावा. ४ धर्मराज. ५ खालीं तोंड करून.

नकळे देहाला ॥ आवरून पार्थाला धरिला ॥ पडला ०॥ ९॥ देव-अर्जुन, रणामध्यें गेलें ॥ बाळक धरणीवरिलाळे[1] ॥ कुरुळ केंस, रक्तांनी भरलें ॥ आवरुन पार्थां स्तब्ध केलें ॥ धरून पांटाशीं. चुंबन[2] दिलें त्याला ॥ मुखचंद्र तो धुळीनें भरला ॥ शिरीं पाहिला, गदेचा टोला ॥ गहिंवर देवाला आला ॥ पडला० ॥ १० ॥ बोले अभिमन्यु, झाला वृत्तांन ॥ जयद्रथानें दिली लात ॥ सूड घ्या त्याचा, करूनी पुरुषार्थ ॥ मी पहातों क्षण मुहूर्त ॥ इतकें बोलूनी, समाधिस्थ झाला ॥ चंद्रलोकीं प्राण गेला ॥ पडला० ॥ ११ ॥ देव भगवान[3], भगिनीकडे[4] गेला ॥ थोर आकांत तिनीं केला ॥ माझा अभिमन्यु, कसा रणीं पडला ॥ काय मीं पाहुं उत्तरेला[5] ॥ असो

---

१ पृथ्वीवर. २ मुका. ३ कृष्णभगवान. ४ बहिणीकडे. (सुभद्रेकडे.) ५ अभिमन्यूच्या स्त्रीला.

धिक्कार, तुझ्या धनुष्याला ॥माझा प्राण नष्ट झाला॥ पडला०॥१२॥ कृष्णासह पार्थ, आले रणांत॥ पळत सुटला जयद्रथ॥ अहा रे दुष्टा, पाप केलें बहुत॥द्रौपदी छळली वनांत॥ तूंच अपराधी, पुत्रास दिली लात॥ जवळ आला तुझा मृत्य॥पडला०॥१३॥ जयद्रथ पहा, पाठीशीं दीनकर॥ उदयीं उडवीन शीर॥ पहा अवस्था, प्रळय होईल थोर॥ पडेल पित्याचे मांडिवर॥ त्याणें टकलिलें, पडलें धरणीं॥ देह पडला तेचक्षणीं॥ मृत्यु पावले, बाप-लेक दोन्ही॥ अघटित देवाची करणी॥ पडला अभिमन्यू. अभिमन्यु०॥१४॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत मुख्यत्वें वीररस आहे. एके दिवशीं दुर्योधनाचा व द्रोणाचा पण पडल्या नंतर द्रोणाचार्यांनीं चक्रव्यूह रचिला त्या वेळचें हें वर्णन आहे- ह्यांत अर्जुनपुत्र अभिमन्यु लहान

---

१ द्रुपद राजाची कन्या. (पांडवांची स्त्री.)

असून त्यानें रणांत एकट्यानें बहुत पराक्रम करून पुष्कळ वीर पाडले; तेव्हां कौरवपक्षीं सर्व राजे भयभीत होऊन दुर्योधनालाही भीति उद्भवली. ते वेळीं द्रोणाचार्याला दुर्योधन लाऊन बोलला कीं, तुह्मी मनापासून युद्ध कां करीत नाहीं? पांडवांचें रक्षण कां करितां? इकडे युद्धाची गर्दी चाललीच आहे. दुर्योधनाची सेना या भाषणानें झटून लढत आहेच अशा समयीं अभिमन्यु बाळ बिचारा एकटा! पाठीशीं कोणी साह्यकर्त्ता नसल्यामुळें नाइलाज होऊन रणांत पडला, त्या वेळीं जयद्रथानें त्यास लात मारली. हें मरणाचें वर्तमान ऐकून धर्मराजादि पांडव अत्यंत शोक करिते झाले. इकडे अर्जुनास अपशकुन झाल्यामुळें शिबिरांत कृष्णासह येऊन त्यांनीं शोध केला त्या समयीं अभिमन्यूचें वर्तमान कळल्यावर मोठा आकांत झाला. पुढें अर्जुन रणांत पुत्राचे प्रेता जवळ आला आणि त्याचे मस्तकावर गदेचा घाय पाहिला त्या वेळेस रणांत झालेला वृत्तांत अभिमन्यूनें अर्जुनास तुटक शब्दांनीं सांगून जयद्रथानें रणांत पडल्यावर लात मारली याजबद्दल त्याचा

सूड घ्यावा. इतकें सांगितलें आणि प्राण सोडिला.नंतर अर्जुनानें मोहेंकरून अतिशयच शोक केला. कृष्णानें त्याचें व सुभद्रेचें शांतवन केलें आणि जयद्रथ व त्याचा बाप यांस मोठ्या युक्तीनें अर्जुनाचे हातून मारविलें व भक्ताचें संगोपन केलें, हा चमत्कारिक व मनोरंजक कथाभाग वर्णन केला आहे.

---

## गाणें. ५ वें. रंभा.

पहा पहा इंद्राचे सभेला ॥ पण रंभेनें हो केला ॥ जिंकुन आणिन शुकदेवाला ॥ गुरु वसिष्ठ बोलिला ॥ कीं रंभे जाई ग येथूनी ॥ १ ॥ नष्ट तूं ग कामिनी ॥ मलि ग नारि इमानी जगभुलवणी ॥ अ०क० ॥ पहा पहा कीचक बळिवंत ॥ मनांत धरितो हे खंत ॥ द्रौपदी भोगीन रे क्षणांत ॥ या हो चित्र शाळेंत ॥ भिमानें टाकीला रगडूनी ॥ नष्ट० ॥ २ ॥ पहा पहा परस्त्रीचे संगतीनें ॥ बुडाले राजे कोण कोण ॥ पहा पहा लंकेचा रावण ॥ सफयीं

गेला बुडून ॥ लंका जाळूनी केली धु
ळधाणी ॥ नष्ट० ॥ ३ ॥ पहा पहा परस्त्रि
येची संगत ॥ जिवाचा ही होई घात ॥
रामनाम स्मर रे बा मनांत ॥ मध्वना
थ बोलत ॥ बापा लागा रे हरिभजनीं ॥
नष्ट तूं ग कामिनी ॥ भली ग नारि इ-
मानी० ॥ ४ ॥ ॥ ॥ ५ ॥ ॥

तात्पर्य- ह्या गाण्यांत, इंद्राचे सभेंत रंभेनें अ-
सा पण केला कीं, शुक योगी यांस स्वर्गांत मी जिंकून
घेऊन येईन. ते वेळीं वसिष्ठ बोलले कीं, स्त्रियांची जात
नष्ट. जगाला भुलवणारी आहे. हिच्या नादास लागले
त्या लोकांची झालेली धुळधाणी सांगून तिजपासून
दूर राहून जीव हो रामनाम स्मरा अशा विषयीं बोध
आहे.

---

गाणें. ६ वें, जिवाजी पाटील.

जागा रे जागल्यानो[1] तुह्मी सावध व्हा रे ॥
कायापूर नगरीची तुह्मी जागल करित

---

१ हे पंच प्राणानीं.

जारे॥ अ० क०॥ मृत्युलोकीं-पाताळीं॥ स्वर्गलोकींचा वास॥ कांहीं नाहीं भरंवसा ॥पहातां पहातां॥ पडेल यमाचा फांसा॥ जागा०॥ १॥ जिवाजी पाटलाची, साडे-तिन हात मांडी[1]॥ तिचाच एक पाय, ढां-सळेल तांतडी॥ तिचींच पांच[2] पोरें, मो-डतिल कैकांच्या खोडी॥ जागा०॥ २॥ जिवाजि पाटलाला. आहे बा एक नारी[3] ॥ टाकोनि मंचक, तिला बसविलि वरी॥ तिचीच एक बटिक[4]. ही कारभार करी॥ तिचेच बुद्धीनें. नगरि[*] नासली सारी॥ जागा०॥ ३॥ जिवाजी पाटलाला, बारे सावध करा॥ मनाजी कुळकरणी, गां-व बुडविला सारा॥ अवघ्या कागदांचें. गुज आणिलें घरा॥ कोल्हाजी[5] बोवानीं, येऊन मुकाम केला॥ जागा०॥ ४॥ पहातां पहातां कसा घोटाळा झाला॥

---

१ देह. २ पंचमहाभूतें (पृथ्वी, आप, तेज, वायु. आणि आ-काश.) ३ अविद्या. ४ माया. ५ अहंकारांनीं. * देह.

डोळस वाडीचा, पूर निघोन गेला ॥ कानपूर ओस पडलें, नाकपूर थबकलें ॥ जागा० ॥ ५ ॥ दांताड वाडचा, गाव मोडूनि गेला ॥ हें लक्षण झालें, गांडगापुर वाहुं लागलें ॥ देसाई-देशपांडे, त्याणिं वसूल काढविला ॥ पेंठकर ह्मणवीती, आह्मीं वसूल दीला ॥ नगद नारायण, त्याणि उपकार केला ॥ जागा० ॥ ६ ॥ संत संतानी, हा घोटाळा केला ॥ नमीतस भूमी, लावी सांडस आंगाला ॥ रामदास ह्मणतो, स्वामी चौऱ्यासिभला ॥ जागारे जागल्या नों तुह्मी सावध० ॥ ७ ॥ ॥ ६७ ॥

तात्पर्य— हें फारच चमत्कारिक रूपक देहावर केलें आहे. यांत देह, इंद्रियें, व त्यांचे विषय यांजविषयीं ज्या योजना केल्या आहेत त्या चांगल्या कल्पनेच्या आहेत. हें रामदास स्वामी यांनीं केलेलें कवन आहे.

---

१ पंचविषय ( शब्द, स्पर्श, रूप, रस, आणिगंध.)
२ अवयव.

## गाणें ७ वें. जहाज.

भरली यमुना भरपुर आज॥ हरिनें घातलें जहाज॥ संगें गोपाळांची फौज ॥शिड्या लाऊनी शिडताज॥ बैसूनी गोळणी करिती मौजा॥ बोले गरुडध्वजा॥ पाणी ह्मणा "कोणि तुह्मीं ह्मणा ना" ॥१॥ जहाज ननो कान्हा॥ भरली यमूना " बाइ यमुना "॥ अ० क०॥ भरती आली यमुना जळा॥ जहाज घालीं तें सांवळा॥ तों त्या जहाजा पडला डोळा॥ पाणी वाहे खळखळां॥ हरिनें काढीला कांबळा॥ जहाजास घातला बोळा॥ पाणी आटपेना "हो आटपेना "॥ जहाज०॥२॥ बुडालें जहाज गेलें पाताळा॥ मजशीं बोल रे गोपाळा॥ फर फर सोडुन चंद्रकळा॥ देते हरिशी वेल्हाळा॥ घ्या तुह्मी नारायणा " हो नारायणा "॥ जहाज०

---

१ रुष्णा. २ भोंक. ३ स्त्री.

॥३॥ दुसरी गोळण ह्मणे मी कष्टी॥ मजशीं बोल रे जगजेठी॥ फर फर सोडुन पांटाव धटी॥ देते हरीशी गोमटी॥ घ्या तुह्मीं जगजिवना "हो जगजिवना"॥ जहाज०॥ ४॥ तिसरी गोळण ह्मणे मी प्यारी॥ मजशीं बोल रे श्रीहरी॥ फर फर सोडुनि ही शेलारी॥ देते हरीच्या करीं॥ घ्या तुह्मीं जगजिवना "हो जगजिवना"॥ जहाज नेतो कान्हा॥ ५॥ ॥ ७॥

तात्पर्य- ह्या गाण्यांत श्रीकृष्ण गोपींसह नौकेंत बसून यमुना भरपूर भरली असतां गेले, आणि मौजा करीत आहेत तोंच नौकेस भोंक पडून आंत पाणीं येऊं लागलें. त्या वेळेस श्रीकृष्णानीं आपले अंगावरील कांबळा काढून नौकेस बोळा घातला तरी पाणी आटोपेना अशा वेळीं गोपींची धांदल व त्यांचें कृष्णावर प्रेम यांचें सुरस वर्णन केलें आहे.

---

१ कृष्ण.

गाणें. ८ वें. चेंडू.

श्रवण करावें नंदियमुनेचा डोह भयंकर दिसे॥ आंत काळिया विशाळ जहरी परिवारानें वसे॥ गरळ कठिण जळ दोहीं थडीनें जिव-जंतू हि न दिसे॥ वरून उडतां पक्षी मरूनी जळीं पडती फारसे॥ अशा तिरा सन्निध एक तरु कळंबाचा हो दिसे॥ तेथें हरि-गोपाळ धेनुसवें गेले क्रीडा मिसें॥ चाल॥ तेथें हरिनें चेंडु फळीचा डाव मांडिला बरा "हो बरा"॥ गडी घेत वांटून लगोरीमध्यें रचली तऱ्हा "हो तऱ्हा"॥ श्रीधराशि ह्मणती डाव तुह्मांवरि आला "हो आला"॥ मग तेथून हरिनीं चेंडू झुगारिला "हो झुगारिला"॥ मग तेथुन चेंडू उडूनि गेला कळंबावर तोही॥ अडचणींत गुंतला डहाळीवर संकट पाही॥ १॥ मदनमस्त हा सर्प काळिया यमुनाजळ डोहीं॥ धन्य प्रभु

श्रीहरी करितसे युद्ध तयाठायीं॥ अ०
क०॥ खेळगडी ह्मणताति हरी रे दे
चेंडू आमुचा॥ तेव्हां हरि कळंबावर
चढला निर्भय तो साचा॥ उदकावर
खांदीचे अग्रीं जागा अडचणिचा॥
त्या ठायीं पहातां घाबरे जिव गोपा-
कांचा॥ उतर उतर दे चेंडू आमुचा
जळिं तेथें कैचा॥ डोहामधिं हा दुष्ट
काळिया घातक प्राण्यांचा॥ चाल॥
श्रवण करूनी उडी टाकिली जळीं
बुडाले पहा "हो पहा"॥ सुरभीनीं[1]
सोडिलीं वत्सें हंबरताती टाहा "हो
टाहा"॥ रोहिणी-नंद-यशोदा शोक
पावले॥ रवि[2]-शशि[3] अवघे ऋषि मुनि
स्तब्धावले॥ मग सकळ जनानी अन्न-
पाणि वर्जिलें॥ झाला आहाःकार व्रजा[4]-
जामधिं सुचेचना कांहीं॥ मदनमस्त०
॥२॥ जळिं चेंडू पडतांचि कालिया

---

१ गाईनीं. २ सूर्य. ३ चंद्र. ४ गोकुळांत.

घेऊन निजला शिरीं॥तिथें वेगानें सन्मुख जाउन उभे राहिले हरी॥ शेषाच्या स्त्रिया आणि कन्या डचकुनियां अंतरीं॥ श्रीहरिशी पुसती बाळा तूं कोण कुणाचा तरी॥ काय काम तूं आलास येथें सांग आह्मां लवकरी॥ धन्य धन्य तुझि माता तूं ही धन्य बाळ मनहरी॥ चाल॥ आतां जाइं जाइं तूं येथून आपुले स्थळा "रे स्थळा"॥ आतां नको बोलुं नाजूक दिससी हो पुतळा "हो पुतळा"॥ तुझ्या भाषणें होइल जागृत नको करूं रे छळा "रे छळा"॥हरी ह्मणे चेंडू द्यावा बरवे पर्णी॥ नाहीं तरी काळिया मर्दिन एके क्षणीं॥ अशा उण्याभाषणें स्त्रियांना राग आला देहीं॥मनीं आश्चर्य मानुनि ह्मणती कोण ग हा बाई॥ मदनमस्त०॥ ३॥ विशाळ काळिया निजला होता उठला क्रोधा-

१ समोर. २ मनांत.

उनी ॥ फोंफावुन मुखिं ज्वाळा जहरी धांवे काढुन फणी ॥ अगणित वेढे घालुन हरिला डंकि वर्म लक्षुनी ॥ थोर युद्ध हें कृष्ण-सर्पीं झालें त्याच क्षणीं ॥ अकस्मात देतसे धडक जशि चपळा सौदामिनी[1] ॥ चाल ॥ सकळ मणी सर्पाचे तुटले मुर्छित झाला कसा "हो कसा" ॥ पुच्छ धरुन सर्पाचें फिरवुन केली हो दुर्दशा "हो दुर्दशा" ॥ मूर्छागत झाला तो तेव्हां मग वेसण टोचली ॥ काळियावरी उभा श्रीहरी अशी मात[2] वर्तली ॥ असा वेणु वाजवी नित्य हरि रागिणि नवि गाई ॥ तीस मुखानें किति वर्णावें अधीक चतुराई ॥ मदनमस्त० ॥ ४ ॥ शेषाचे फणि गणित हरी तो पद देउन नाचे ॥ पृथक पृथक ते आलाफ होती मंजुल गानाचे[3] ॥ मग सर्प विनविती ह्मणे दे मजला दान

---

१ वीज. २ गोष्ट. ३ गाण्याचे.

जिवनाचें[1]॥ केविलवाणी स्त्रिया बोलती चुडेदान वाचे॥ चाल॥ अनन्य भावें शरण तुह्मांला नका नेउं हो पती "हो पती"॥ तेव्हां कृपाकू श्रीहरी बोलिले जावें समुद्राप्रती "हो प्रती"॥ ह्या नर-नारी नगरच्या गोकुळ-वृंदावना॥ आले साधु-संत मग तेथें हो सज्जना॥ हातीं घेउन पंचारति हरिला ओवाळूं पाहती॥ दोन्ही कर जोडून हरीची करिती वीनंती॥ मदनमस्त हा सर्प०॥ ५॥ ॥ ७॥ ॥ ॥

**तात्पर्य–** ह्या गाण्यांत श्रीकृष्ण गोपाळांसह यमुनेचे तीरीं चेंडूफळी खेळत असतां घडलेला चमत्कार वर्णिला आहे. तो असा.–

एके दिवशीं चेंडूफळी खेळतानां सर्व गोपाळ कृष्णाला ह्मणाले कीं, डाव तुमच्यावर आला. तेव्हां श्रीकृष्णांनीं चेंडू घेऊन फेंकून दिला, तो यमुनेच्या तीरीं कळंब वृक्षावर जाऊन अडकला, ते वेळीं गोपाळ

---

१ प्राणांचें.

फारच पाठीस लागले आणि कृष्णा, आमचा चेंडू आणून दे असें ह्मणूं लागले, तेव्हां श्रीकृष्ण त्या झाडावर चढले. इतक्यांत चेंडू खालीं नदींत पडला व त्याचे बरोबर श्रीकृष्णांनींही उडी टाकली. हें पहातांच खेळगड्यांमध्यें व गोकुळवासी जनांत एकच कल्लोळ होऊन गेला. सकळांनीं अन्नपाणी वर्ज केलें; सूर्य, चंद्र, ऋषी हे स्तब्ध झाले. इकडे श्रीकृष्ण यमुनेंत जाऊन कालियासमोर उभे राहिले. त्याचें अनुपम रूप पाहून नागपत्न्या ह्मणाल्या. बाळा, तूं आणि तुझी माता धन्य आहेस. तूं येथें कशाला आलास? आपले ठिकाणीं जा, नाहीं तर पति जागा झाल्यावर मारील. हें ऐकून यांनीं सांगितलें, माझा चेंडू द्या; नाहीं तर आतांच काळियास मारून चेंडू घेऊन जातों. हे शब्द ऐकतांच स्त्रियांस राग आला. पुढें युद्ध झालें, नंतर काळियास जीवदान देऊन सागरांत राहण्याची आज्ञा दिली व सर्व जनांस आनंद दिला. हा कथाभाग थोडासा काळिया नांवाचें गाणें आहे त्यांत आहे परंतु त्यापेक्षां यांत विस्तार कांहीं जास्त आहे.

---

गाणें. ९ वें. कृष्णाचें.

आला वनमाळि रात्रीं सत्यभामे मंदिरीं॥
पुसतसे स्वानंदें विनोदें परोपरी॥आ-
ज तुह्माला हो कृष्णा उशिर कांहो ला-
गला॥ तृषाक्रांत कांहो झालां असा
कोठें भागलां॥ मुखप्रभा दिसते पिं-
वळी कोणे सदनिं जागलां॥ अपरात्रीं
फिरतां तुह्मीं भय नाहीं अंतरीं॥आ-
ला०॥१॥ नाहीं कोठें गेलों होतों रु-
क्मिणीचे महालीं॥ पुष्पशेज पाहोनी-
यां झोंप मज लागली॥ अकस्मात
जागा झालों तुझी स्मृति जाहली॥
ह्मणोनीयां वेगें आलों आलिंगितों सुं-
दरी॥ आला०॥२॥ रुक्मिणीचें मिष
करुनी राधेगृहीं राहिलां॥ बाळपणा
पासोनीयां देह तुज वाहिला॥ अपमा-
न करणें किती आजवरी साहिला॥
आजपासोनीयां तुह्मीं नका येऊं या
गृहीं॥ आलावनमा०॥३॥ आला राग

पाहुनियां गुप्त झाला श्रीहरी ॥ दिसे- नासा झाला कोठें भयाभीत अंतरीं ॥ दिनानाथ मी अनाथ तुजवीण घाबरी ॥ विनवि अंत नको पाहूं भेटी देई लोकरी ॥ आला० ॥ ४ ॥ ॥ ९ ॥ ॥

तात्पर्य– एके दिवशीं श्रीकृष्ण रुक्मिणीचे मंदिराहून मध्यरात्रीं सत्यभामेचे मंदिरीं आले तेव्हां सत्यभामेनें विचारलें कीं कृष्णा आज उशीर कां लागला? व तुमचा मुखचंद्र म्लान कां दिसतो? इत्यादि सत्यभामेचे प्रश्न ऐकून कृष्ण ह्मणाले रुक्मिणीचे महालीं गेलों तेथें पुष्पशय्या पाहून झोंप लागली नंतर अकस्मात् जागा होतांच तुझी आठवण झाली ह्मणून येथें आलों असें ऐकून सत्यभामेस राग आला तोंच कृष्ण गुप्त झाले अशी कथा आहे.

---

## गाणें.१०वें, जग किंवा देखवनभूल.

मृगजळवत[1] जग उद्भवलें[2] हें जाण सर्व माया ॥ देखवनभुल हे समजुन उमजुन

---

१ खोट्या उदका प्रमाणें. २ उत्पन्न झालें.

कां भुलसी वायां ॥ हो सावध हो साव-
ध मूढा भुलुनि नको जाऊं ॥ मंदांध[1] हो-
उनि परस्त्रियांचीं मुखें नको पाहूं ॥ चा-
ल ॥ कोण कोठिल[2] हा शोध करीं पामरा,
"रे पामरा" ॥ हा विवेक[3] चित्तीं कांहिं
ठसूं दे जरा, "रे जरा" ॥ विषयांस भुलू-
नी करशिल नाना तऱ्हा, "रे तऱ्हा" ॥
विकळ पडुन हे क्षणांत जाइल बुदबु-
दवत् काया ॥ १ ॥ देखत भुल हे सम-
जुन उमजुन कां भुलसी वायां ॥ अकल क-
डवें ॥ कोणि नव्हे कोणाचा हा तूं वि-
चार करिं चित्तीं ॥ अकस्मात यम घा
ला घालिल मग फसशिल अंतीं[4] ॥
चित्रगुप्त[5] यमदूत सभेप्रति नेउन तुज
पापें ॥ पुसतिल जेव्हां काळरूपि ते म-
ग होइल फें फें ॥ चाल ॥ स्मरेल तुज
हें त्या वेळेस सांगणें, "रे सांगणें" ॥

---

१ गर्वानें आंधळा. २ यः कश्चिन्. ३ सुविचार.
४ शेवटीं. ५ ईश्वराकडील पापपुण्याचा लेखक.

मग देवहि न करी आठवितां धांवणें,
"रे धांवणें"॥ मग, नाहीं फळ वांचु
नियां धिक् धिक जिणें[1], "रे जिणें"॥
काम क्रोधादिक षड्[2]रिपु तुजला ब
सले फसवाया॥ देखतभुल०॥ २॥
नाना योनी फिरतां प्रभुला तव करु[3]-
णा आली॥ तरावयाला यांतुन तु-
जला नर[4]काया दिधली॥ याला विस-
रुन विषयीं गुंतुन् वर्तसि[5] उफराटा॥
याच गुणें प्रभु कोपुन[6] देईल नर[7]तनु-
ला फांटा॥ चाल॥ ही पुन[8]रपि नरत
नु तुजला न मिळे कदां, "रे कदा"॥
मग नाना[9]योनी भ्रमत असावें सदां,
"रे सदां"॥ चिरकाळ तयांतिल भो-
गावी आपदा[10], "रे आपदा"॥ भव[11]
सांडनि अग्निस्पर्शी उडती वरति जशा

---

१ जीवित. २ सहा शत्रु (काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर.) ३ दया. ४ मनुष्यदेह. ५ वागसि. ६ रा-गाऊन. ७ मनुष्य देहाला. ८ पुन्हा. ९ जन्म. १० दुःख. ११ संसार.

लाह्या॥ देखतभुल०॥ ३॥ जगदीश्वर
जो पतीतपावन शरण तया जावें॥आ-
शा- कामादिकां अगोदर सोडुनियां द्या-
वें॥ मूर्खपणें तूं मनीं मानिशिल जग-
दीश्वर पैसा॥ जन्म-मरण संबंधि भ-[1]
वाब्धीं तो तारिल कैसा॥ चाल॥ या
अशा रीतिनें करशिल आपुली धुळी,
"रे धुळी"॥ बा स्वार्थास्तव सत्संग[2] ध-
रावा मुळीं, "रे मुळीं"॥ निशिदिनिं[3]
वदनीं[4] वद शिवनामावळी, "रे वळी"॥
कविराय तुला सांगतसे हें भजकीं हरि
पायां॥ देखतभुल०॥ ४॥ ॥७॥

तात्पर्य- ह्या गाण्यांत मनुष्यांस संसारांतून तरून जाण्या साठीं उपदेश केला आहे. तो असा कीं; हें सर्व जग संपूर्ण विषयांनीं भरलेलें असून मृगजळवत् ह्मणजे खोट्या उदका प्रमाणें आहे. नानाप्रकारच्या योनीं पासून त्रासलेल्या प्राण्यास पूर्वकर्मानें मनुष्य देह प्राप्त झाला आतां तरी विषयादिकांचा (कामादिषड्रिपूंचा)

---

१ संसारसमुद्री.२ चांगल्याची संगत. ३ रात्रंदिवस. ४मुखीं.५बोल.

त्याग करून सर्वांनी जो जगदीश्वर त्याच्या भार[illegible] वें; म्हणून सावध हो, सावध हो. अशा [illegible] ना दाखविली आहे.

---

## गाणें. ११ वें. लंका.

लंका पुरीं, पुरीं राज्यनगरीं ॥ आनंद करिती नर[1]नारी ॥ गुढ्या तो[2]रणें, तोरणें घरोघरीं ॥ कल्पवृक्ष असे दारीं ॥ प्रसन्न केला. "अहो सीते प्रसन्न केला." केला सांब भोळा ॥ द[3]शानन विनवी पद कमळा ॥ १ ॥ अ[4]शोकवनीं, वनीं ज[5]नकबाळा ॥ दशानन० ॥ अ० क० ॥ घरें सोन्याचीं, सोन्याचीं उंच महालें ॥ हिरे जडितांचीं वर कवलें ॥ कि[6]लच्या, वांसे रंगवीले ॥ खणोखणीं आ[7]यने लावियेले ॥ रेखिलींग चित्रें, चित्रांच्या शाळा ॥ दशानन० ॥ अशोकवनीं० ॥ २ ॥

---

१ स्त्रीपुरुष. २ मंगळदायक पल्लव बांधणें. ३ रावण. ४ नामक बागेंत. ५ सीता. ६ फळ्या. ७ आरसे.

अश्व[1]-गज[2]-रथ, रथ-शिबिंका-हस्ती॥ निशाणें-चौघडे हि झडती॥ असंख्य दळ[4], दळा नाहीं गणती॥ वाद्यें-वाजंत्रें वाजती॥ अशि ग संपत्ती, संपत्ति सुखसाहळा॥ दशानन०॥ अशोकवनीं०॥ ॥३॥ चौक अंगणी, अंगणीं पाचबंदी॥ हिरे जडितांची मकरंदी॥ पुरे ग पुरे, पुरे महालबंदी॥ बैठक मंडपांत रंगीं॥ सुरूचे खांब, "अहो सीते सुरूचे खांब," खांब दीपमाळा॥ दशानन०॥ अशोक वनीं०॥ ४॥ वस्त्र-भूषणें, भूषणें लेववीन॥ मुक्ताफळें दिव्यरत्न॥ चामर ग छत्र, छत्र तुज धरीन॥ निज मंचकीं बैसवीन॥ विनंती ऐका, "अहो सीते विनंती ऐका," ऐका वेळोवेळां॥ दशानन०॥ अशोकवनीं०॥ ५॥ पोताड[5] ग वाची, वाचि ब्रह्मदेव॥ ऐकती नारद-वैष्णव॥ अंगणीं ग झाडी, झाडी

---

१ घोडे. २ हत्ती. ३ पालखी. ४ सैन्य. ५ पंचांग.

वायुदेव ॥ सडा शिंपी मेघराव[*] ॥ इंद्र
तो गुंफी, गुंफी पुष्पमाळा ॥ दशानन०
॥ अशोकवनीं० ॥ ६ ॥ चोहोंकडेचव-
दा, चौदांची गणना ॥ वर कैलास[1]-
पती राणा ॥ सकळ दैवतें, देवतें बंदि
खानां ॥ कुबेर भांडारींचा राणा नेमि-
लिंग कामें, कामें देवां सकळां ॥ दशान-
न० ॥ अशोकवनीं० ॥ ७ ॥ ऐशा ग व[2]-
निता, वनितांची खूण ॥ गाती सुर[3]
तीं पुराणें ॥ वसिष्ठ मुनी, मुनी करि-
ति ध्यान ॥ कडेकपाटें लाऊन ॥ ध्याति
ग सदां, सदा पदकमळा ॥ ऐक लंके-
च्या चांडाळा ॥ ८ ॥ राम जीवींचा जिव्हा
ळा ॥ ऐक० ॥ अ० क० ॥ ऐंशि ग हजार,
हजार कामीनीं[4] ॥ मंदोदरी पट्टराणी ॥
उभ्या करकमळें, कमळें जोडूनी ॥ सेवा
करीती निशिदीनीं ॥ राम० ॥ ९ ॥ मृगज-
ळ काया, काया संसार ॥ अभिमान तुला

---

१ शंकर. २ स्त्रिया. ३ देव. ४ बायका. * इंद्र.

रे थोर ॥ सागरीं नीरीं. तिरीं रामचंद्र ॥ मजसाठीं आले सत्वर ॥ जाईं तूं शरण, शरण गोपाळा ॥ ऐक० ॥ राम जीवींचा जीवींचा जिव्हाळा ॥ ऐक०॥१०॥ ५॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत लंकाधिपति रावण आपलें अत्यंत वैभव सीतेस सांगून आपणास तिनें वश व्हावें ह्मणून परोपरीनें विनवणी करीत आहे; परंतु पातिव्रत्यच स्त्रियांचा मुख्य धर्म असें मानणारी जी सीता ती त्याच्या वचनास व वैभवास किंचित न भुलून उलटा त्याचा निषेध केला.

---

गाणें. १२ वें. केशव.

पाप-पुण्य हें समान होतां नरतनु[1] मज लाधली[2] ॥ बहुत सायासें गोष्ट साधली ॥ पितृवीर्य हें मातेउदरीं आकृति संभावली ॥ हस्त-पादादिक वपु[3] निर्मिली ॥ नऊ महिने जरि गर्भी असतां दुःखें आणिक सोशिलीं ॥ मळ-मूत्रांत काया

---

१ मनुष्यदेह. २ सांपडली. ३ शरीर.

कीं घोळली ॥ जेव्हां सोहं शब्दानें रुवि
लें सोडिं येथुनि माधवा॥ आतां कधीं
भेटशील केशवा ॥ १ ॥ जन्म-मृत्युचे
फेरे फिरतां श्रम झाले या जिवा॥आ-
तां०॥ अं०क०॥ उदरांतुनि बाहेरी ये-
तां सोहं शब्द सोडिला॥ तुझ्या नामा-
चा विसर पडला॥ क्षुधा लागली[1] त्या
दुःखानें टाहो जो पसरिला॥ जननि
ह्मणे काय झालें बाळाला॥ उदरदु:
ख हें ह्मणुन मातेनें गरळ रस पा-
जिला॥ ज्ञान बोलाया नाहीं मला॥
अशिं दुःखें हीं बाळपणीं सोशितां
नाहीं विसावा॥ जन्म-मृत्यूचे०॥२॥
बाळपण गत होतांना तारूण्य प्राप्त
जाहलें॥ कसें विषयाशीं मन लुब्धलें॥
मातापिता[2] तुच्छकरूनी स्त्रीनें मन मो-
हिलें॥ जसें कळसूत्र हालवि बाहुलें॥
गोड न लागे दुसरें कांहीं घे विषयाची

---

१ आई. २ बाप.

हवा॥ जन्म-मृत्युचे०॥ ३॥ तरूणपण गत होतांनां मग वृद्धदशा पावली॥ जरेनें[1] अवचित माळ घातली॥ नेत्र जहाले अंध दिसेना वर्णकांति झांकली॥ तनू[2] वाळली मान वांकली॥ पुत्राशीं काकुळति येतसे हातिं धरुन वागवा॥ जन्म-मृत्युचे फेरे०॥ ४॥ ॥

तात्पर्य- ह्मांत, पूर्वकर्मानें व्याप्त झाले त्या नरतनूंत ईश्वर प्राप्ती होऊन मुक्तिपद प्राप्त व्हावें परंतु बाल, मध्य आणि वृद्ध अशा तीन प्रकारच्या शरीर अवस्थांनीं मोहरूपी संसार समुद्रांत पूर्ण लोटिलें आहे. अशा त्रासामुळें प्राणी दीनवाणीनें ह्मणतो कीं, हे परमेश्वरा- हे केशवा- अशा ह्या त्रासा पासून लौकर मुक्त कर-

---

## गाणें. १३ वें. धांवा द्रौपदीचा.

ऋतुस्नात मी मंदिरीं बसलें होत्यें निवांत॥ एकाएकीं दुष्ट पातला दुःशासन

१ ह्मातारपणाचें एक चिन्ह. २ शरीर.

तेथ॥ नेउन मजला उभि ग केली भर[1]-
ल्या सभेंत॥ ह्मणे दुर्योधन ये बस अंकीं
नको खेद वाहूं॥१॥ यादवराया-मम भा-
ईया नको निष्ठुर होऊं॥ निढळा[2]वरती
हात ठेउनी कितिरे वाट पाहूं॥ अ०क०॥
संचितमाझें फिरलें दैवा कर्म ऋळू ना-
हीं॥ दैवदशा मम फिरली कांही बोल
तुला नाहीं॥ धर्म-भीम-अर्जुन-नकुल-
सहदेव खालि पाही॥ यादवराया०॥२॥
दुष्ट झोंबतो वसनीं[4] माझे काय मौज
पाहशी॥ कशिरे निद्रा आलि दयाळा
हीच वेळ केशी॥ रूढ तुझी मी बहीं-
ण तुझी मी दिसतें परदेशी॥ माझे वेळ
मौन्य धरिलें कोण दुजा पाहूं॥ यादव
राया०॥३॥ गजेंद्रानें धांवा केला त्या-
स सोडवीलें॥ ध्रुव बाळक हे वनीं हिं-
डतां अक्षयपद दिधलें॥ प्रल्हादाचें
संकटसमयीं स्तंभीं[5] अवतरलें॥ माझे

1 माडीवर. 2 कपाळाच्या भागावर. 3 माझी. 4 वस्त्रीं. 5 खांबांत.

वेळे मौन धरीलें कोण आतां पाहूं॥ यादवराया०॥ ४ ॥ जरी किनारी पदर नारळी पीतांबर पिंवळा॥ कळसपाकळी लेउन गुलनारी-पैठणि-पातळा॥ चंद्रकळा-शेलारी-कुसुंबी-बसंतीरंगि बहू॥ पर्वत पडले गणीत नाहीं मुखिं कुठवर गाऊं॥ यादवराया-मम भाईया०॥५॥

तात्पर्य- ह्यांत महा दुष्ट जो दुर्योधन त्याच्या आज्ञेनें, दुःशासनानें महापतिव्रता जी द्रौपदी तिला सभेंत नेऊन कौरव दुरुत्तरें बोलले. ह्मणून परमकष्टी होत्साती तिनें दीनस्वरें कृष्णाचा धांवा केला त्यामुळें श्रीकृष्णपरमेश्वर प्रसन्न होऊन वस्त्र हरण समयीं अगणित वस्त्रें द्रौपदीस नेसवून तिला व सज्जनांला आनंद दिला.

---

## गाणें. १४ वें- बुडबुडा.

बाळपणीं अज्ञानपण गेलें॥ खेळखेळतां स्वहित नाहीं केलें॥ इतकें तुजला बक्षीस देऊं केलें॥१॥ सावध सावध

अजून नगं मूढा॥ नरदेह जातो पाण्याचा बुडबुडा॥ अ० क०॥ तरुणपणीं भरला असे ताठा॥ विषयसौख्यें हिंडशी दाही वाटा॥ वृद्धपणीं फुटला तुज फांटा॥ सावध०॥ २॥ वृद्धपणीं भरला असे चळ॥ जिव्हा वांकुडी करीते तळमळ॥ नाहीं स्मरला हृदयीं रघुवीर॥ सावध०॥ ३॥ खालीं डोकें वर टांगतील पाय॥ सांडसानें टोंचती लिंगदेह॥ यम तुजला घालती दंडघाय॥ सावध सावध०॥ ४॥

तात्पर्य- ह्यांत बाळपणीं, तारुण्यांत व वृद्धावस्थेंत मनुष्यांस ईश्वरभक्तींत येणाऱ्या नडी दर्शवून संसार हा पाण्याच्या बुडबुड्या सारखा आहे. याकरितां अजून तरी सावध हो अशा विषयीं प्राण्यांस बोध केला आहे.

---

१ मूर्खा. २ मनुष्यदेह. ३ दाही दिशेला. ४ तरुणपणाच्या कामावरून बेकार होणें. ५ वेड.

## गाणें. १५ वें. त्रिजटा.

वल्कलवेष्टित काया[२] असतां आनंदांत उपवनीं[३]॥ अकस्मात येऊन ठाकला सुवर्णमृग[४] काननीं॥ सुवर्णचोळी घालिन आंगीं अशी दुराशा[५] मनीं॥ येउन मागें घालविला तो त्रैलोक्याचा धनी॥ चाल॥ करुनियां भाव[६] राक्षसि ग॥ मारिली हाक भलतशि ग॥ शोषा मी पडलें फशी॥ कर्णीं ऐशी हाक ऐकतां हृदय कंट दाटला॥१॥ त्रिजटे कधिं ग पाहिन नयनीं घनश्यामसांवळा॥ दशरथनंदन राम दयाळू हृदयीं मी प्रणियला[७]॥ अं०क०॥ त्रिजटा शांतवि सीतेप्रति तों येउन अंजनिसुत[८]॥ रामचंद्र अंगुलिची मुद्रा[९] प्रेमानें टाकिन॥ अवलोकुन[१०] उचकली मनीं मग ह्मणे पूर्वे

---

१ झाडाच्या खालीं. २ शरीर. ३ बागेंत. ४ सोन्याचा हरिण. ५ वाईट आशा. ६ माया. ७ नम्र केला. ८ मारुती. ९ नामाची आंगठी. १० पाहून.
* पंचवटी नामक अरण्यांत.

संचित॥ अंतरली रघुराजपाउलें ह्मणुनि अश्रु ढाळित॥ चाल॥ घेउनियां मुद्रे करीं॥ आलिंगुनि हृदयीं धरी॥ कां रुसलिस रामावरी॥ राक्षसभुवनीं आलिस करिं तूं त्यजुनि रामपाउलां॥ त्रिजटे०॥२॥ मुद्रे लागीं पुसते सीता रामचंद्र स्वस्थ कीं॥ सौमित्रातें व्यर्थ ग छळिलें दुःखच वाटे मनीं॥ कपट करुनि संन्यासि ह्मणतसे भिक्षा दे मजप्रति॥ भिक्षा घेउन त्वरित चालिला धरिलें मज हस्तकीं॥ चाल॥ घेउनियां स्कंधावरी ग॥ चालला लंकापुरीं ग॥ भीति नसे हृदयांतरीं ग॥ ते समयीं मज साठिं जटायू प्राणाला मुकला॥ त्रिजटे०॥३॥ वक्षस्थळ पिटुनियां करितसे शोक रामांगना॥ काय गती जाहाली

---

१ राक्षसाचे घरीं. २ लक्ष्मणाला. ३ रूपधारी रावण. ४ खांद्यावर. ५ रामभक्त पक्षी.

मुद्रे दशरथनंदना॥ सनक-सनंदन चरणीं ज्याचे करिति सदां वंदना॥ मुद्रे कशि ग आलिस सोडुनि कल्प-तरू चंदना॥ -चाल॥ तो येउनियां मारुत॥ ह्मणे माते मी राघवदुत॥ ज्या भीतो वैवस्वत॥ चंद्रवदन तो हृदयीं ध्यावा ज्याची अघटित लिळा॥ त्रि-जटे०॥ ४॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत श्रीरामचंद्राच्या विरहानें लंकेंत, सीता शोक करीत असतां त्रिजटा तिचें शांतवन करीत आहे, इतक्यांत मारुतीनें ते-थें गुप्तरूपें जाऊन प्रथमतः रामचंद्राची आंगठी सीतेच्या आंगावर टाकिली, व ती विस्मयांत आहे तोंच मारुती प्रत्यक्ष प्रगट झाला; हें वर्णन आहे.

---

## गाणें १६ वें. कालियामर्दन.

पूर्णब्रह्म अवतार आठवा अघटित इ-च्छामात्रेंकरी॥ गोप मुलांची प्रेतें

---

१ नामाचे प्रख्यात भक्त. २ नमनास. ३ यम.

उठविलीं धेनुसहित कालिंदितिरी॥अ० क०॥ गरुडभयें तो दुष्ट कालिया सर्प सदा यमुनेंत दडे॥ स्नान-पान सग- ळेंच राहिलें दुरून दर्शन मात्र घडे॥ मीन-मगर उसळोनि सोडिती प्राण ति- राचे पलीकडे॥ पक्षि उडुन अंतरिक्षिं जातां अकस्मात जळिं येउन पडे॥ अरण्य झालें शुष्क समोंतें यमुना जळ गरळानें कढे॥ अमृतघट ठे- विल्यामुळें त्या कदंबाचें कांहीं न झ- डे॥ असा भयंकर काळचि केवळ वि- षार त्याचा कोण हरी॥ उभयतिरीं ज- न वस्ति न करिती जाति निघुनी ग्रा- मांतरीं॥ पूर्णब्रह्म०॥१॥ पूर्वकथा वि सरून गोवळे त्वरित धांवती तृषेमु ळें॥ गाई-वासरें त्यानिं दटाउन क- ळप पुढें घातले बळें॥ उदक पितांक्षणिं

१ यमुनातटीं. २ पाणी पिणें. ३ मासे. ४ सुसर. ५ विषानें. ६ नामक झाड. ७ हरण करील.

पडलिं निचेष्टित वदनांतुन चेतानि जळें ॥ कोण अशा वांचविल कृष्णा अंतरलों आह्मी गृह-स्थळे ॥ स्वात्मा-अंतरसाक्षि-त्रिविक्रम नको धांवण्या निमिष पळें ॥ कृपा दृष्टि पाहतांचि उठविलीं गाइ-वत्सें गवळ्यांचिं कुळें ॥ कदंब तरुवर चढुन पितांबर कसूनि बळकट खोंवि निरी ॥ उडी टाकितां पाणि उडालें गगन झांकलें मुहूर्तवरी ॥ पूर्णब्रह्म० ॥ २ ॥ वृत्तांत यमुनेतिरीं जो झाला गोप येउनी निवदिती ॥ गोकुळांत जन-नंद-यशोदासहित सर्वही आक्रंदती ॥ भेटशील कधिं शाम-सुंदरा क्षेमरूप तूं आह्मां प्रती ॥ दीर्घस्वरें रडतात किती पडतात पुढें धांवती किती ॥ राम ह्मणे तुह्मिं स्वस्थ

---

१ मुखांतून. २ आपला आत्मा. ३ तीन पदानें भूमि वेष्टीत करणारा वामन. ४ आकाश. ५ दोन घटिका. ६ सांगतात. ७ शोकानें ओरडती. ८ बळिराम.

असावें अजरामर तो जगत्पति ॥
गर्वरहित काळिया करूनी कृष्ण येइल पहा शीघ्रगती ॥ शोक नकाकरं धीर धरावा सत्य सांगतों परोपरी ॥
अजरामर वैकुंठपती तो शंकर ज्याचें पूजन करी ॥ पूर्णब्रह्म० ॥ ३ ॥ कालियानें ती मूर्ति विलोकुन फोंफाउन धांऊन आला ॥ नखशिखें पर्यंत हरीला घालुनि वेढे आंवळिला ॥ शरीर फुगवुन पराक्रमानें झट्कन वेढा काढीला ॥ स्वस्वर मुरली वाजवून तो भुजंग मोहुन नादविला ॥ भ्रमीत-मूर्छित करुन कालिया क्रूर सर्प तो लोळविला ॥ चुंडेदान माग ताति कांता प्रताप अद्भुत दाखविला ॥ मुकुंद-माधव लिलावनारी थयथय नाचे फणांवरी ॥ कांही सुचेना

---

१ जरामरण नाहीं असा. २ तावडतोब. ३ शेंडी. ४ भ्रमयुक्त. ५ निचेष्टित. ६ स्त्रिया. ७ चमत्कारिक.

भुजंगास त्या मुर्गाळुन धरि पुच्छ करीं[2]॥ पूर्णब्रह्म० ॥४॥ आदिपुरुष वळखून कालिया मस्तक ठेवी पदांबुजीं॥ क्षमा करीं अपराध माधवा मी आहें तव चरणरजीं॥ कृपा करुनि भगवान ह्मणे तूं सागरिं जाउनि मला भजीं॥ खगेंद्र[3] मुद्रा माझि विलोकुनि नाहिं गोष्ट करणार दुजी॥ श्रीहरि आज्ञेवरुनि सागरीं आनंदकरि एकांत गुजी॥ उदक अमृता तुल्य जाहलें त्रिकाळ जन यमुनेस पुजी॥ भागवतांतील गोष्ट कशी शुक परिक्षितीला सांगे बरी॥ त्याच कथेचें कवन प्रभाकर करुन सभा डोलवी खरी॥ पूर्णब्रह्म० ॥५॥ ॥६॥ ॥

तात्पर्य– ह्यांत श्रीमद्भागवतांतील कथा शुकानें परिक्षितीला सांगितली आहे. येथें कालिया सर्पाच्या विषानें विषरूपी झालेलें यमुनेचें पाणी प्याल्यामुळें गोपाळ, गाई व त्यांचीं वत्सें निचेष्टित

१ शेंपूट. २ हातीं. ३ गरुड.

पडलीं, नंतर श्रीकृष्णानें कृपादृष्टीनें त्यांस उठवून आपण कदंबाच्या झाडावरून कालियामर्दनाकरितां यमुनेंत उडी टाकिली. हा वृत्तांत यशोदा व नंदादि गोळी यांस गोपांनीं कळविला. नंतर ते अतिशय शोकांत निमग्न झाले असतां बलिराम कृष्णाचा पराक्रम सांगून तो आतां परत येईल असें समाधान करीत आहे. इकडे डोहामध्यें कृष्णाच्या अंगावर सर्प क्रोधानें येतांच त्यास श्रीकृष्णानें मनोरम मुरलीनें मोहून अगदीं भ्रमित व मूर्छित केला, पुढें त्याच्या स्त्रियांनीं चुडेदान मागितल्यावरून सर्पास (कालियास) समुद्रांत राहण्या विषयीं आज्ञा केली व यमुनेचें पाणीं शुद्ध केलें आणि नंदादि गवळी व सर्व जन यांस आनंद दिला.

---

## गाणें. १७ वें. तुळशीदास.

आज्ञा वंदुनि श्री रामाची निघाले मग तेथून॥ हस्तनापुरीं[1] कनोजि[2] ब्राह्मण बादशहाचे दिवाण॥ मग त्या स्त्रीच्या

---

१ दिल्लींत. २ कानकुब्ज.

उदरिं[१] राहिले वाल्मिकऋषी आपण॥ जन्मकाळीं बारावे दिवशीं नांव ठेविलें आवडीनं॥ तुळशीदास ह्मणोन नगरीं साखर-पानें वांटून॥ दिवसा नुदिवस थोर झाला मग केलें त्याचें लग्न॥ विशेष लंपट स्त्रे[२]दरीतें वर्जिले माहेर॥१॥ कलियुगामधें चरित्रदा वा तुळशीदास अवतार॥ अ०क०॥ बादशहाची दया त्याजवरि नित्य बोलावी आवडीनं॥ एक दिवसस्वाशीस निघाले तुळशीदास घेऊन॥ ममताईचे माहेराहुन कागद आणिला गड्यानें॥ तुझे मायेला बरें नाहीं वाटत निरोप सांगितला त्यानें॥ निरोप ऐकतां मनीं डचकली पुसे सासुला जाऊन॥ स्वामी गेले शीकारीला तोंवर येतें भेटून॥ आज्ञा घेऊन त्वरित निघाली माहेराशीं जाऊन॥

१ पोटीं. २ स्त्रीस.

भेटलि मायेला कईक दिवस राहु-
न घेतली आवडीनें॥ तुळशीदास
आले घराशीं पहातात मंदिरिं जाऊ-
न॥ निजभुवनावर दिसत नाहीं को-
ठें गेली कामीन[1]॥ माता ह्मणे तुळ-
शीदासा ऐक माझें वचन॥ तुझे
सासूला बरें नाहीं वाटत गेली
भेटी कारणें॥ संध्याकाळचा वायदा[2]
केला आतां येईल परतून॥ चार
घटिका रात्र झाली मावळलें कीं
दिनमान॥ तुळशीदास वाट पहाता-
त अजून येईना सुंदर॥ कलियु-
गामधें॥ २॥ पायीं वहाणा चाले
चरणीं सास्कर वाडी जाऊन॥ क-
ड्या-कुलपें-जंजिरे-वाड्यांत जागे
नव्हते ही कोणी॥ खिडकीमधें ना-
ग लोंबतो पाहीला मग दृष्टीनें॥ ध-
रला नाग केला लाग[3] हवेलीवर चढून॥

---

१ स्त्री. २ मुदतीचें नेम. ३ संबंध.

अवघा वाडा गलबल झाला धरला चोर ह्मणून॥ लाउन दिवट्या पाहुन दृष्टी तुळशीदास ओळखून॥सासु-सासरा बाहेर आलीं मग आली त्याची सुंदर॥ कलियुगामधें०॥३॥ हस्तकीं धरून तुळशीदास मंदिरामधिं नेऊन॥ पलंगिं बसविले कांता त्याशीं मंजूळ बोले वचन॥ माझे जीवासाठीं एवढे रात्रीं कां आलां धांऊन॥ माझ्या सारखी चांगली कीं नव्हती नगरामधिं कोण॥ एक रुपया खर्ची जाता रात्र जाते ह्या गुजरून॥बरें असो हो वाड्यामध्यें कोणिकडुन तुमचें येणं॥ तुवां टाकिला दोर त्याला आलों आहें धरून॥ कोठें आहे दोर दावा मला उठा हस्तकीं धरून॥ दोर दावितां नाग पहातां पडे धरणीवर उलथून॥दे भगवंता लाउन दाता अपर देवरूप तुह्मी॥

धन्य माते कृपावंने करितों तुजला नमस्कार ॥ नमस्कार मजला कशास करितां मी तुमची दासी जाणा ॥ दासी नव्हे माझी मावशी मजला वाट दावीशी ॥ धन-संपदा टाकून त्यांनां निघाले मग तेथून ॥ क्षीर सागरीं वाल्मीकांना हरी बोलले उत्तर ॥ कलियुगामधें चरित्र दावा तुळशी दास०

॥४॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥

तात्पर्य — ह्या गाण्यांत महान् कीर्तिमान् व प्रसिद्ध साधु तुळशीदास यांची पूर्वस्थिति व वैराग्यशील साधु होण्याचें चमत्कारिक कारण वर्णिलें आहे; तें असें कीं, एके दिवशीं बादशाहाबरोबर तुळशीदास शिकारीला गेले असतां सासू फार दुखण्यानें पडली असें कळविण्यास सासुरवाडीहून मनुष्य आला. तेवेळीं तुळशीदासाची स्त्री ममताई इनें सासूची परवानगी घेऊन लौकरच येईन असें ह्मणून आपल्या आईस भेटावयास गेली. इकडे तुळशीदास घरीं आल्यावर प्रथमतः महालीं स्त्री नाहीं हें

पाहिले. पुढें चोकशी अंतीं माहेरीं गेल्याचें कारण समजलें. परंतु तुळशीदास स्त्रीलुब्ध विशेष असल्यामुळें चईन पडेना, सबब रात्रीचे रात्रीं साकरवाडीस गेले; तेथें माडीवरून सर्प लोंबत होता तो दोरच आहे असें समजून त्यास धरून वर गेले तेथें त्यांस अंधारांत न ओळखल्यामुळें चोर ह्मणून धरले. पुढें दिवा आणून पाहिल्यावर हे जांवई असें समजलें. नंतर स्त्रीनें त्यास महालीं नेऊन मोठ्या प्रीतीनें व विनोदानें विचारलें कीं, माझ्याकरितां एवढी तसदी कां घेतली? एकादा रुपया खर्च केला असता तर मजसारखी सुंदरी नगरांत मिळाली असती; बरें असो. तुह्मी वरती कसे आलां तें मजला सांगा. तेव्हां तुळशीदास ह्मणाले, तूं जो दोर टाकून ठेविला होतास त्याला धरून मी वर झालो. असें ऐकतांच ममताई त्यांस ह्मणाली कीं तो दोर कोठें आहे तो मजला दाखवा चला! असें ह्मणतांच ती स्त्रियेला दोर दाखविण्यास गेले. आणि पहातात तों तो दोर नव्हे सर्प आहे. तेव्हां परमेश्वराचें अगाध कौतुक पाहून तुळशीदास विस्मय पावले आणि स्त्रीस माता ह्मणून नमस्कार केला व पूर्ण वैराग्य

त्यांस झालें.

---

गाणें १८ वें, रंग.

श्रीरंग गोपिकों[1]संग धरुनि करि रंग हरी हा बाई ॥ कुं[2]जांत मातला वसंतसा-गु[3]मी काई ॥ अं० क०॥ तो कुंज रसाचा पुं[4]ज बांधिला गुंज नद्यामधिं मुरली[5]॥ अति मंजुळ हरिनें वदनें[6]सरोजीं धरिली॥ ठायिं ठायिं नूपुरें[7] वाजती झणत्कृती भरली ॥ त्या र[8]सिक व्रजांतिल सुंदर ति-तुकी सरली॥ अति मंद शीतल सुगंध जांति[9]निष्यंद म[10]रुत्कृति भरली॥ ती शोभा नच वर्णवे रमा अवतरली ॥ चाल॥ रंगांत गोपिंच्या पडल्या, किति उड्या ॥ किति रासमंडळीं जडल्या, हो त्या सड्या ॥ किति श्रीहरिच्या तोंडीं,

---

१ मांडी. २ वेलीनीं वेष्टिलेले जाग्यांत. ३ वहराचा ऋतु. ४ समुदाय. ५ वेणू. ६ सुखकमलांत. ७ पादभूषणें. (तोरड्या, पैंजण) ८ रसभिज्ञ. ९ जाईपासून वाहणारा. १० वाऱ्याची (कृती)

देती विड्या ॥ या सार स्फुरवा नाहिं पार
काय संसार हरीच्यापायीं ॥ या चित्तवृ-
त्तिला दुजें स्फुरेना कांहीं ॥ श्रीरंग०
॥१॥ तूं जरी रुक्मिनियां घरीं मंचकाव[1]-
री बैसलिस भामा[2] ॥ तरि काय हरीला
उणया स्फुरसिका[3] रामा[4] ॥ हा भाग तु-
झा तरि लाग नको धरुं राग रिझवि[5]
गुणधामा[6] ॥ जी रसिक[7] नव्हे ती स्त्री
न ह्मणावी पामा[8], किति मुली मिळा-
ल्या हुलीस[9] त्याच्या कुळीं किं कुश-
ला रामा[10] ॥ श्रीमाधवसंगें गडे पुरविती
कामा ॥ चाल ॥ किती गुलाल-केश-
री रंगें, भिजविल्या ॥ किति मानवती
मदभंगें, निजविल्या ॥ किति देउनु
रति स्फुरवसंगें, रिझविल्या ॥ हा हाट[11]
हरीचा थाट गोपिला वाट सुचेना कांहीं ॥

---

१ पलंगावर. २ विशेषनाम. (स्त्री) ३ उत्तम प्रकारच्या रसिक. ४ स्त्रिया. ५ आनंदवी. ६ श्रीकृष्णाचें विशेषण. ७ रस जाणून आनंदविणारी. ८ खरूज. ९ हुलकावणीस. १० स्त्री. ११ बाजार.

या मुखें वदूं किति पिचकाऱ्यांची घाई॥ ॥ श्रीरंग० ॥२॥ मधुकरी[1] पंकजावरी[2] तशा एक सरी धांवल्या रमेणी[3]॥ गेलि उमा रमा-सखु-भाऊ-मैना-विमणी॥ चाल ऊठ जाउं रंग लूट पडूं नये तूट हरीच्या चरणीं॥ यापरि मग समजुन गेल्या दोघी गडणी॥ त्या पाशिं मिळाल्या रसीं उतरल्या सुशीं नंदजाचरणां॥ स्त्रीजन घरि भगवंत कृपानिधि करणी॥ चाल॥ ही वसंत माधव होरी, कोणि शिका॥ जरि गानां हरिची थोरी, मेवभि कां॥ नर वर्णन करितां चोरी, करुं नका॥ हें पर्व पाकलें सर्व नको धरूं गर्व तरा कविराया॥ धनवान कोणाचे बाप कोणाची माया॥ श्रीरंग गोपिकोत्संग०॥३॥

---

१ भ्रमरांनीं. २ कमलावरी. ३ स्त्रियांचे. ४ एकप्रकारची गाण्याची चीज.( शृंगाररस प्रधान) ५ संसाराची भीति. ६ आनंदाचा योग.

तात्पर्य- हें मुख्य शृंगाररस प्रधान गाणें आहे. ह्यांत श्रीकृष्ण गोपींसह कुंजवनांत रंग खेळे ल; त्याचें वर्णन फार सुरस केलें असून प्रास फारच चांगले साधले आहेत व त्या रंगाच्या गर्दीत झाले- ली गोपींची स्थिति फार उत्कृष्ट व रसभरित वर्णि- ली आहे.

---

गाणें. १९ वें, वेणी.

भक्ति ग वेणी माझि गुंफा गे साजणी ॥ अ० क०॥ चिंता चतुरा चौघी जणी ॥ एकाचित्तें घाला वेणी ॥ सद्भाव फु- लें लाऊनी ॥ चौघी ग बहिणी माझि० ॥ भक्ति०॥१॥ निष्ठा गजदंताची[1] फ- णी ॥ प्रपंच[2] मळ काढा विंचरूनी ॥ मुक्त केश रुळती[3] चरणीं ॥ भगवद्भज नीं माझि० ॥ भक्ति०॥ २॥ चंद्र-सूर्य तो बिजवरा ॥ मुद-राखडी-चंद्रकोरा॥

---

१ हस्तिदंती. २ संसार. ३ लोळती.

त्रिगुणाचाळा तीन पदरा॥ आवळा
ग वेणी माझि०॥ भक्ति०॥ ३॥ सगु
णा मोत्यें भांगीं भरा॥ फुल मोगरई
न फुल मोगरा॥ पंचरंगी गोंडे भ-
रा॥ गोफ लाऊनी माझि०॥ भक्ति०
॥ ४॥ अवघड वेणीचें गुंफणें॥ सद-
गुरु वांचून गुंफिल कोण॥ सिता
राम हात जोडूनी॥ भगवद्भजनीं
माझि०॥ भक्तिगवेणी०॥ ५॥ ॥

तात्पर्य— हें सितारामकवीनें केलेलें
चमत्कारिक वेदांत विषयावर रूपक आहे.

---

गाणें. २० वें, वनवासीराम.

अयोध्यारे ओस पडली तुजवीण
आजी रामा॥ कांहिं एक मजला न
गमे साधुजन विश्रामा॥ श्रावणारि
हा मूर्छित पडला आग लागो तुझ्या
नेमा॥ आला तुज मागें रामा कोठ-

---

१ तीन गुण -(सत्व, रज, तम.) २ कवीण. ३ दशरथ.

वरी धांवूं धांवूं ॥१॥ कौसल्या ह्मणे बा! रामा! नको वेना जाऊं जाऊं ॥ मा झीयारे तान्ह्या बाळा तुला कोठें पा- हूं पाहूं ॥ अं०क०॥ स्तनीं लोटलासे पान्हा बाळा जवळि येई येई ॥ न- को मला कष्टी करूं स्वरवें राहुं गृहीं गृहीं ॥ सांडुनिया राज्यासना वनीं कांहीं नाहीं नाहीं ॥ आतां तुझ्यामुळें रामा विष तरी घेऊं घेऊं ॥ कौसल्या० ॥२॥ हरणीच्या पाडसाला[2] वनीं चूक- लें मी बाई ॥ तैशी गति झाली मजला रडतें मी धायीं धायीं ॥ नको आतां टाकुन जाऊं मज कडे पाहीं पाहीं ॥ कैकयीच्या संगें स्वरवें गृहीं कशी रा- हूं राहूं ॥ कौसल्या० ॥३॥ राम जातो वनांतरीं अयोध्येस झालें दुःरव ॥ वि- श्वव्यापक सगूणसिता-राम माय-बा- प॥ लक्ष्मुमणबंधू सवें सर्व जन करिती

१ अरण्यांत. २ वत्साला. ३ जग भरलेला.

शोका॥ अखंडीत रामचंद्रीं चित्त माझें राहू राहू॥कौसल्या०॥४॥रामाचें निधान मोठें मानेशीं ग सांपडलें॥ हातींचें ग उंच रत्न जळीं कसें अर्पीयेलें॥ कौसल्या ह्मणे रामानें मज कैसें पाठवीलें॥ रामलक्ष्मुमणसीता माघारी ग येऊं येऊं॥ कौसल्या०॥५॥ सीता स्वरूपानें फार अतिसकुमार वाणी॥ चरणीं रुततील खडे आतां तुझे माय बहिणी॥ तृषाक्रांत रामा सीता उभा राहुन पाजी पाणी॥ चतुर्दश वर्षे वरी किती दुःख साहूं साहूं॥ कौसल्या०॥ ॥६॥ त्याजवरी करा छाया दिनकर कूळदीपा॥ जवळ राखें वनीं जळा वरुणा तूं मायबापा॥ पदोपदीं रक्षा तान्ह्या वनवास नाहीं सोपा॥ साधुप्रभाकर ह्मणे गुण किती गाऊं

---

१ द्रव्यनिधी. २ चौदावर्षे.

गाऊं ॥ कौसल्या ह्मणे बा रामा नको वना० ॥ ७ ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत, श्रीरामचंद्र दशरथाची आज्ञा घेऊन वनवासास जाऊं लागले त्या वेळेस त्यांची माता कौसल्या अतिशय प्रेमानें कंठ सद्गदित करून ह्मणते, बा रामा, वनांत नकोरे जाऊं! अरे वनवास सोपा नाहीं, बाळा फार कठीण आहे रे? अशा प्रकारें मातेनें पुष्कळ सांगितलें परंतु पूर्वी झालेली दशरथाची आज्ञा प्रमाण मानून लक्ष्मण व सीतेसह राम वनांत गेले. त्या वेळेस राम वियोग दुःख मनांत आणून कौसल्येनें पुष्कळ विलाप केला. यांत कवीनें शोकरस फार चांगला वर्णिला आहे.

---

गाणें. २१ वें, चोळी.

अनुभवचोळी लेउनि साजणि निमग्न मी झाल्यें ॥ परात्परेशा चिन्मय रूपा नयनीं देखीलें ॥ अ० क०॥ प्रपंच-माया त्यागुनि सखये झालें मी

वेडी ॥ आशा-मनशा-तृष्णा सांडु-
नि झालें मी उघडी ॥ काम-क्रोध हा
लोभ साजणी केला देशोधडी ॥ पं-
चविषय हा व्यर्थ पसारा विवेक बळ
रगडी ॥ चौदेहाची निरास करुनी
गेलें पैलथडी ॥ सद्गुरुरूपें कुंकुं ले-
उनी त्रिगुण गुंति तोडी ॥ मोह-वास
ना-ममता याची केली मी साडी ॥ क-
रीं धरोनी सद्गुरुनें दिली चिद्रत्नीं
जोडी ॥ त्रिवेणी संगमीं स्नान करू-
नी चोळी मी ल्यालें ॥ अनुभव० ॥
॥ १ ॥ काय सांगूं सखे नवल ती श्री-
गुरुची करणी ॥ चिद्रूपाची चोळी
मजला दिधली बेतोनी ॥ पंचरंगि
हें रेशिम सुंदर केलीसे अटणी ॥
पांच पंचविस बूट छत्तिस पाहिय-
ले नयनीं ॥ नवविधतुकडे प्रेम सुईनें

---

१ श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवा, अर्चन, वंदन, दा-
स्य, सख्य, आणि आत्मनिवेदन अशी नवविधाभक्ति.

केली उभारणी ॥ भाव कशीदा विवेक भिंगें केलीसे जडणी ॥ चंद्र-सूर्य हे दों बाह्यांशीं प्रकाश कोंदणीं ॥ अधोमुखी हे नागिण सुंदर नांव कुंडलणीं ॥षड्चक्राचा भेद करोनी निवांत मी झालें ॥ अनुभव० ॥ २ ॥ चार-साहा-दाहा-बारा पाहीले कमळ ॥ षोडश दोनसहस्रदळांचा मार्गच हा अचळ ॥ संत्रावीचें पान करोनी झालें मी नीळ ॥ इडा-पिंगला मार्ग सुषुम्ना तपस्वी बाळ ॥ ओट-पीट-गोल्हाट-हाट-श्रीवाटच ही सरळ ॥ त्रिकुटावरती भ्रमर गुंफा मी पाहीली निवळ ॥ झगमग नयनीं जोत दखिली विचित्र हा खेळ ॥ शुद्धस्वरूपीं चित्त रंगलें झालें मी सुशिळ ॥ अक्षय चोळी आंगीं लेउनि सोंवळि मी झालें ॥ अनुभव० ॥ ३॥ आणिक स्यां हें नवल

---

१ आत्मानात्मविचार. २ जीवनकळा.

देखिलें उफराटा पिंजरा ॥ तिनशेंसा-ठ जोडुनि तुकडे केलासे पुरा ॥ बह-त्तर खोल्या सांधे सोळा नवखंड वसुं-धरा ॥ सप्तद्वीप औटकोटी लेव पाहे शरीरा ॥ एकविस सहस्र साळ सांजि-री पाहे माधुरा ॥ जें जें पिंडी तें ब्र-ह्मांडीं बोले वैखरा ॥ ऐसें जाणुनि हृदयीं कमळीं अनुभव घेई खरा ॥ सच्चित्सुख घनरूप पाहुनी तल्लीन मी झालें ॥ अनुभव० ॥ ४ ॥ बारा-सोळा एकविसहजार अखंड दिन निशीं ॥ अहोरात्रहो माप चालिलें पहा तुम्ही त्याशीं ॥ सोहंध्यानीं लक्ष लावुनी पहा त्या स्वरूपाशीं ॥ त्रैलो-क्याची रचना चोळी माझी ही क-रशी ॥ सद्गुरुचरणा शरण जाउनी जन्म-मरण निरशी ॥ द्रव्य-पदार्था निरशी ॥ द्रव्य-पदार्था त्याग करुनी

१ साडेतीन कोटी. २ केश. ३ वैखरी.

अक्षय तूं होशी ॥ माझें रूप हें मज दावीलें अभिनव मानसीं ॥ चिन्मय चोळी आंगीं लेउनी शरण सद्गुरूशीं ॥ करीं धरूनी कृष्णकिंकरा निजपद दावीलें ॥ परात्परेशा चिन्मयरूपा नयनीं देखीलें ॥ अनुभव० ॥५॥ ॥७॥ ॥७॥

तात्पर्य- हें गाणें वेदांतविषयावर आहे. ह्याचा अर्थ फार गहन असून यांत वासनाक्षय, शब्द, स्पर्श, रूप, रस गंध, हे पंचविषय, कामादिक षड्रिपु यांची योग्यता व भक्तीचे प्रकार आणि तत्वें ह्यांचें विवेचन केलें आहे. तसेंच योगसाधन, इडा पिंगळादि मार्ग, देहाचें विस्तारानें वर्णन, श्वासोच्छ्वासांची संख्या इत्यादि सांगितलें आहे. व सद्गुरूचे महत्व दर्शवून त्यांच्या रूपेचें महत्व वर्णिलें आहे.

---

गाणें. २२ वें. मुरली

गोपाळगड्यांचा मेळ ॥ हरी संगें खेळ ॥ कुंजवनीं रमली ॥ १ ॥ नको वाजवुं श्रीहरि मुरली ॥ तुझ्या मुरलीनें तान्ह-भूक

हरली " तान-भूक हरली " ॥ अ०क०॥ खुंटला वायुचा वेग ॥ वर्षती मेघ॥ जळें स्थिर झालीं ॥ नको० ॥ २ ॥ गाई तृण-वत्स न घेति ॥ स्तब्ध रवि वरती ॥ मयुर नादवले ॥ नको० ॥ ३ ॥ मुरलीच्या ना-दें देव ॥ ऋषीगण योगी ॥ समाधी सु-टली ॥ नको० ॥ ४ ॥ नगरिंच्या आम्ही व्रजललना ॥ तळिन मदना ॥ पिडाब-हु झाली ॥ नको० ॥ ५ ॥ चरणींचा प्रियसखा दास ॥ मानानो वास ॥ आस ना पुरली ॥ नको वाजवुं श्रीहरिमुरली ॥ ६ ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

तात्पर्य- ह्या गाण्यांत श्रीकृष्णांनीं कुंज-वनांत अतिमनोरम मुरली वाजविली व तत्क्षणीं त्या मुरलीच्या प्रभावानें झालेला चमत्कार त्याचें सुंदर वर्णन केलें आहे.

---

१ गवन. २ स्त्रिया. ३ भक्त. ४ इच्छा.

गाणें. २३ वें. कृष्णजन्म.

माता गे एश्वदा, एश्वदा पुढें घेऊनी॥ त्या हांकुनी पाहे गर्गमुनी॥ देखिलीं ग चिन्हें. चिन्हें राजिवनयनीं॥ ह्मणे हा भक्तांचा ऋणी॥ पाहिला ग हात, हात पारखूनी॥ सर्व गुणि बत्तिसलक्षणी॥ चाल॥ भाग्याचा मोठा॥ ह्याच्या पायावर दिसतो गोटा॥ कोण ह्रदयिक आलें पोटा॥ विश्वाच्या ओढिल जटा॥ घेईल धावणी. धावणी नष्ट-खेळा॥ ह्यासी कारण शिशुपाळ॥ १॥ हो कृष्ण जन्मले, जन्मले विश्वपाळ॥ गर्गमुनी सांगति जन्मकाळ हो कृष्ण जन्मले॥

अ० क०॥ एक वहुरूप्या- " अग एश्वदे एक बहुरूप्या " रूप्या येईल॥सोंग भलाचें घेईल॥ त्यास पाहुनियां, पाहुनियां भुलशिल॥ नेउन बाळाला दावशिल॥ बाळाचा हात, हात तो

१ कमलनेत्र जो कृष्ण त्याचे ठायीं. २ जगनाच्या. ३ दुष्ट.

पाहिल ॥ तुला बाई भलतेंच सांगेल ॥चाल॥ ठेउं नको याला ॥ [1]मुळपंच-कावर झाला ॥ असें नव्हतें कळलें गेर-ग्याला ॥ असें बोलतांच मार होईल त्याला ॥ जिव येईल पाटया-वर्वंटया ला॥ बाई पाठींत ग, पाठींत बसतील मुसळ ॥ होईल पळतांना धांदल ॥ हो कृष्णा० ॥२॥ ठेउं नको हाशीं, " अग एश्वदे ठेउं नको ह्याशीं" त्यास आंगण्यांत ॥ कावळा येईल ह्मणा वर्त ॥ धूळ गाड्यांची. गाड्यांची अकस्मात ॥ कठिण एक घोड्याची लाथ, दोन मोठालीं झाडें आंगण्यांत॥ त्याजवर आहेत भूत ॥ चाल ॥ मोठां भेसूर ॥ तो करिल त्याचा उद्धार॥ कालिया सर्प अनिवार ॥ यमुनचे तिरीं मांडिला असें खेळ ॥ तेथें ब्रह्मातें

---

१ ज्योतिषमतें हा जन्मण्याला फार वाईट काळ आहे. २गर्ग मुनीला. ३ कपटवेषानें आलेला कावळा.

स्थळ॥ हो कृष्णा०॥ ३॥ पाजूं नको ह्या-
ला ''एय्घदे पाजूं नको ह्याला'' म्हण
तिचाच पान्हा॥ नवानवसांचा तुझा ता-
न्हा॥ जात स्त्रियांची मोल कळेना॥
दृष्टी होईल राजिवनयना॥ कपट
वेष धरुनी, वेष धरुनी पूतना॥ भु-
नावळी हिंडे रानोराना॥ चाल॥ भ-
यासुर मोठी॥ एक रात्र येइल चोर-
टी॥ बाळाला धरील पोटीं॥ स्तन ला-
वील त्याचे ओठीं॥ सम्मुख ची नेईल
हरी वैकुंठीं देईल स्थळ॥ तीन मा-
तेस एक बाळ॥ हो कृष्णा०॥ ४॥ कि-
ती सांगु तुजशीं ''एय्घदे किती सांगु
तुजशी'' तुज माते जननी॥ सात
वर्षांचे चक्रपाणी॥ तोंवर घे आपुलें
स्वकार्य साधूनी॥ पुढें भेटीची शेर-
णी॥ लीला कौतुक, कौतुक कोठवर॥

१ गोष्ट. २ एक राक्षसी. ३ यशोदा, देवकी, आणि पूतनाया तिन्हीं मातांस एकच स्थळ अंतीं देईल. ४ आई. ५ कृष्ण.

रात्र चौथीचा प्रहर ॥ चाल ॥ मुरव पस-
रुनी दावील हरी ॥ त्याशीं भिउंनको सुं-
दरी ॥ त्याची कृपा असेल तुजवरी ॥ स
मुळची नेईल तुला वैकुंठीं देईल
स्थळ ॥ तीन मातेस एक बाळ ॥ हो
कृष्ण जन्मलें० ॥ ५ ॥ ॥ ६९ ॥

तात्पर्य- या गाण्यांत गर्गमुनि कृष्णा-
चीं चिन्हें पाहून त्याची फलश्रुति त्याची माता जी
यशोदा तीस सांगत आहेत. या भविष्यवादांत श्री-
कृष्णाचे बाळपणांत घडणाऱ्या लीला संक्षिप्त रीती
नें वर्णिल्या आहेत. यांचा विशेष विस्तार हरिविजया-
दि ग्रंथांत चांगला रसाळ वर्णिला आहे.

---

गाणें. २४ वें. काशीरवंड.

काशी काशी ह्मणतां जळती पापाच्या रा-
शी ॥ अगणित महिमा शिव तो सांगे
प्रेमें गिरिजेशीं ॥ ध्रु० ॥ भूभागीं हे अस-
तां नाहीं भू ऐसी काशी ॥ गगनाहुनि
अति उंच मुक्तिदा केवळ सुरवराशी ॥

सदाशिवानें रचिला विमुक्त करि जिव-
मात्रासीं ॥ सेवेंत गंगानदीं सुरजिन ए-
शी गुणराशी ॥ चाल ॥ जे त्रिपुरहराची
राजधानी बोलती । सर्वही अपाया वा-
रि तापसंस्मृती । लय कालत्रयीं नाहिं
इचा निश्चिती । पडतांचि तनू जिव
कैवल्या पावती ॥ उपनिषदांचें सारहि क-
ळलें ऋषी जाबालिसीं ॥ अगणित म-
हिमा शिव तो सांगे प्रेमें गिरिजेसीं ॥
काशी काशी ह्मणतां० ॥ १ ॥ त्रैलोक्या
ची विभुता दिधली हरिनें सांबानें ॥ भा
गविते सुस्थीर ह्मणउनी तप करि भावा-
नें ॥ चक्र मारुनी पाताळींचें जळ आ-
णिलें त्याणें ॥ संवत्सर लक्षार्ध दिव्य तें क्र
मिलें जिवनानें ॥ चा० ॥ तें सांब दयाघन
वरदाना पातला । देदीप्य तेजस हरि
नयनीं पाहिला ॥ अतिविस्मित होउनि
निजमाथा हालविला ॥ कर्णांतिल मणि
त्या स्थळीं तदा पडियेला ॥ झालें तें मन

कर्णिक तीर्थ हें सुर नमिती ज्यासी ॥ अ
गणित महिमा० ॥ २ ॥ माध्यान्ही मनक
र्णिक स्नाना येती सुरनरते ॥ कणमात्रोद-
क मिळतां नाचति स्वर्गि पितरग ते ॥
जप तप अल्पही साधन जेथें बहुतचि
फळ देते ॥ तारक उपदेशाचें स्थळ तें
जाणवें निरुतें ॥ चा० ॥ अति महिमा
मोठा पंच नदाचे तिरीं । सुरमुनिजन
नाहती जेथें कार्तिक निरीं । लाविती
दीप बहु नर नारी सुंदरी । पाहतांचि
दिसे भूवैकुंठाचेपरी ॥ भावें पुजिती
बिंदुमाधव ते नर स्वर्गवासी ॥ अग
णित महिमा० ॥ ३ ॥ तिळा तिळावर
लिंगें जेथें पदोपदीं तीर्थं ॥ सर्व तीर्थ
फळ व्हावें ह्मणउनि व्हावीं पंचतीर्थें ॥
असंख्य लिंगामाजी शंभूश यात्रा पर-
मार्थें ॥ कराव्या हें मतव्यासाचें कथिलें
विषदार्थें ॥ चा० ॥ कळिकाळ कर्म हें क-
ण्व ऋषी बोलती । यावरी विराजे असें

मुनी वर्णिती। मच्छाकृति जाणा पंचको
शि परम ती। वरुणा असे दोन्ही भागीं
नद्या मिरवती॥ वाराणसी आनंदाकर
ही देती रूरवशशी॥ अगणित महिमा०
॥४॥ ज्ञानवापिका दिशा ज्यानें ज्ञानदा
त्री केली॥ उदक प्राशितां लिंग उद्भवे भा-
ष्यक हृत्कमळीं॥ पूर्णभद्रसुत दंडपाणितो
सदा द्वारपाळी॥ नमितां त्यातें काशीफळ
देतो चंद्रमौळी॥ चा०॥ जिवमात्रा पुरवी
अन्न भवानी सती। बहु विघ्ना टाळी धुंडि
राज गणपती। स्कंदोक्त सार हें वर्णियें
लें निश्चिती॥ क्षेत्र पाप हराया भावें क
रा पंचक्रोशी॥ अगणित महिमा शिव तो
सांगे प्रेमें गिरिजेसी॥ काशी काशी०॥५॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत पुण्यस्थान काशी-
चें वर्णन केलें आहे. तें असें शंकर पार्वतीस सांग-
तात कीं हे पार्वती काशीक्षेत्राचें काशी काशी असें
स्मरण केलें असतां अगणित पापांच्या राशींचा ना-
श होतो. व भूमीवर असें पुण्य पावन दुसरें क्षेत्र

नाहीं. गगनाहून अति उंच (मोठी) मुक्ति देणारी ही माझी राजधानी मी रचिली आहे. ही सर्व दुःखाचा नाश करणारी असून हिचा प्रलय कालीं ही नाश नाहीं व हिचे ठिकाणीं जे प्राणी मरण पावतात ते मुक्तिला जातात. हींतील गंगा भगीरथानें आपल्या तपःसामर्थ्यानें व मोठ्या कष्टानें भूमीवर आणिली. ज्या ठिकाणीं माझे कानांतील कुंडल पडलें त्या ठिकाणीं मणिकर्णिका तीर्थ झालें. तेथें देव, ऋषि व नाना प्रकारचे प्राणी स्नान दान व तपश्चर्या करितात. ह्या काशी क्षेत्रांत कोट्यावधि सांबाचीं लिंगें व नानाविध तीर्थें आहेत. आणि प्रत्यक्ष अन्नपूर्णा येथें राहत आहे. अशी कथा ह्या गाण्यांत आहे.

---

## गाणें. २५ वें. रुक्मिणिस्वयंवर.

झडकरि द्विज पाचारी। सरवेग झडकरि द्विज पाचारी॥ त्वरें करुनियां पत्र धाडितें बंधू भिमका चारि॥ करुणानिधि श्रीहरी। लिहीतें॥ करुणा०॥ पत्र पाहुनी लवकर यावे

रुक्मिणिच्या मेवरीं ॥ शिशुपाळ नेमि
ला असे रे तो मनांत माझे नसे ॥ मम
हृदयीं घननीळ वरावा निश्चय माझे
मनीं । सखेग । यादव माझे मनीं ॥ शा
हाण्णव कुळ भूपाळ मिळाले मना न
ये कोणी ॥ १ ॥ वाचुनि अंतरगती । प-
त्रहें । वाचुनि० ॥ झर झर झर झर वेष
घेउनी निघावें श्रीपती ॥ अवधि नसे
हो तिथी । स्वामियां । अवधि० ॥ थर थ-
र थर थर कर कांपती त्याह्मवें मी किती
॥ तूं आहेसरे सुजाणरे तूं जाणसि अं-
तरिं खुण ॥ मम हृदयीं घननीळ वरावा
निश्चय तो चरणीं ॥ यदुविर माझे मनीं ॥
सखेग यादव माझे मनीं ॥ शाहाण्णव०
॥ २ ॥ उपाय नदिसे मातें । आणखी । उ-
पाय० ॥ कुल स्वामिणी दर्शन घेतां ह-
रावें मज तिथें ॥ येथूनि जातां मज रे
मग प्रवेश होईना तुज ॥ तरि जाण
खूण कृपा लव करावा सुरमणी ॥ यदुविर०

॥३॥ दीननाथ श्रीहरी। सखेग।दीन-
नाथ श्री०॥ येऊनी करुणा आलाअ-
से तो रुक्मिणिच्या सैंवरी॥ राहुनि
दुरच्या दुरी। हरी हा। राहुनि०॥रथा
रूढ होवोनि हारियेली भिमकाची कु-
मारी॥ मग झालि येकचि घाई रे शिशु
पाळ राहिला ठाई॥ धरा धरा ह्मणतां घे-
उनी गेला चक्रपाणी यदुविर माझें०॥
॥४॥ रथ वेगें चालला। हरीचा।रथ०॥
रथारूढ होवुनियां आलक श्रीहरी-
चा पातला॥ मग बोलतसे रुक्मिणी
रे याशि सोडावा येथुनी॥ गोविंदसु
त विनविलसे याचि लिळा न नेणे -
कोणी॥ यदुविर माझे मनीं। सखेग।
यादव माझे मनीं॥ आह्मणव कुळ
भूपाळ मिळाले मना नइये कोणी॥
॥५॥ ॥ ६॥ ॥ ॥

तात्पर्य— रुक्मिणी आपले सखीसजवळ
बोलावून ह्मणाल्ये कीं सर्व ब्राह्मणासलवकर

बोलाऊन आण ह्मणजे त्याजकडून पत्र कृष्णास पोंचवूं असें ह्मणून पत्र लिहिण्यास आरंभ केला व त्या पत्रांत, कृष्णा मी तुलाच अंतःकरणानें वरिलें आहे आणि माझ्या रुक्मया बंधूनें योजलेला शिशुपाळ मी कधींही वरणार नाहीं ह्मणून तूं लौकर धांवत ये मुहूर्ताला अगदीं थोडा अवकाश राहिला आहे. आतां लिहितां लिहितां माझा हात कांपावयासही लागला हे कृष्णा आह्मी कुलस्वामिणीचें दर्शन घेण्यास जाऊं तेथें तुह्मी येऊन रथांत बसवून मला पळवावी ह्याशिवाय दुसरी युक्ती कांहीं दिसत नाहीं. असें लिहिलें आहे रुक्मिणीचें पत्र वाचून वतिचें सप्रेम अंतःकरण जाणून श्रीहरीस मोठी तिची करुणा आली व त्याप्रमाणें स्वयंवरसमयीं श्रीकृष्ण त्या देवीच्या देवळा जवळच राहिले होते तेथें नानाप्रकारच्या शृंगारांनीं व शस्त्रास्त्रांनीं युक्त अशी मेना व पालख्या अंबाऱ्या इत्यादिकांनीं युक्त अशा आप्तजनांसहवर्तमान ती येताच कृष्णानें तिला रथांत बसवून मोठ्या त्वरेनें पलायन केलें. शिशुपाळ एकीकडेसच राहिला

रुक्मिणीच्या रथारूढ होऊन धरा धरा ह्मणतां तों रु-
क्मिणीचा रथ ही दिसेनासा झाला अशी कथा आहे.
भक्तांचें अंतःकरण जाणून श्रीहरी पूर्ण करितो.

---

गाणें. २८ वें, हरनाकिका.

पार्वति पुसते महादेवाशीं. कांहीं एक पुसतें आतां ॥ दया करावी स्वामी मजवर, चरणीं ठेवितें माथा ॥ पूर्वीं काय मीं तप केलें. तुह्मीच झालेत भ्रतार ॥ ऐशी इच्छा सांगुनि स्वामी. समूळ ऐकें कथा. ऐकें माजणी ॥ १ ॥ हिमवंताचे[1] जन्म उदरीं, अगाध तप तूं केलें ॥ पिकलीं पानें धूम्रपानें[2] शरीर कष्टविलें ॥ कोणे एके दिवशीं देखोनि पीता, नवल मोठें झालें ॥ ऐशी कन्या देऊं कोणा मन हें त्याचें भ्रमलें. ऐकें सा० ॥ २ ॥ नारद येऊनि जवळ बैसले. पुसती कुळगोत्राशीं ॥ त्याची पूजा करुनी पुसती मांगावें वचनाशीं ॥

---

१ हिमालयाचे. २ धूरभक्षणानें.

त्रिलोक नायक विष्णू आहे, द्यावी त्यां कन्येशीं॥ अवश्य ह्मणुनि सत्वर नारद. गेल निजभुवनाशीं, ऐकें सा०॥३॥ अतीत वेषें नारद ऋषी. जवळी बोलावीला॥ हिमवंताचा निरोप सांगतो, कन्या देतों तुजला॥ हंस्तुनि पहातो बरवें झालें, विनोद पाहिजे त्याला॥ शंभुवांचुनि नवरा नाहीं, निंचे हृदयाला॥ अवश्य ह्मणुनी सत्वर नारद गेले वैकुंठाला, ऐकें सा०॥४॥ मायबापें निश्चय केला, कळलें पार्वतीशीं॥ टाकिलें स्नान ध्यान जप तप, निघाली अरण्याशीं॥ धांवन आली सखी तीणें, केली समजावीशी. ऐकें सा०॥५॥ धरिला हात चलआतां, अघोर अरण्याशीं॥ घरांत पाहतां कन्या न दीसे, हळूच बाहेर आला॥ घरोघरीं जाउनि नेथें. पुसती अवघे जनाला॥ इंद्र चंद्र चोंफित जिव्हा, चोरें नेली तिजला॥ सिंहें सर्पे व्याघ्रें

अथवा, उदकीं जीवदिधला, ऐकें सा०
॥ ६॥ घरांत पाहातां कांहीं न दिसे,
गडबड धरणीवर लोळे॥ हळूच उठला
बाहेर आला, थर थर कांपत चाले ॥ ना
ना हृदयीं दीर्घस्थानें, हांका फोडी
बाळे, ऐकें सा०॥ ७॥ बहु श्वापदें भा-
सर वाणी, अखंड असती जेथें॥ क
डा पर्वत फोडुनि पाणी, नद्या वहाती
तेथें॥ झाडें झुडपें विणीत काळ्या,
जावें कवण्या पंथा॥ ब्रह्मा तोही पा-
हुनि न चुके, कैशी येईल येथें. ऐकें
सा०॥ ८॥ अवघे पर्वत फिरतां फिरतां,
बहु श्रम तो झाला॥ सीतळ छाया
फळें पुष्पें, देखुनि श्रमतो गेला॥ इथें
च भेट ह्मणे देवा, नवस तिणें केला॥
नदिच्चे तीरीं वृक्षाखालीं, कन्या दे-
खिली डोळां. ऐकें सा०॥ ९॥ हरता-
ळीका व्रत जैसें. घडलें पार्वतीसी॥
व्रत प्रतापें शिवतो प्रसन्न, झाला

पार्वतीसी ॥ कंदमूळें भक्षुनि निद्रा, करि
ती अति उल्हासें. ऐं० ॥१०॥ धांवुनिजे-
मी वत्सा गाय. प्रेमें धांत ॥ चुकलें बाळक
पुन्हा भेटो, हर्ष चित्तीं मातें ॥ पाहुनि अ-
धिक हिमवंताला, सौख्य सांगों कीती॥
उचलोनि घेतलि दोहीं अंगीं. उचलो-
नि दोहीं हातीं, ऐंकं०॥११॥ कैसी आलि-
स एकटी आलिस. कोंग आलिस ये-
थें॥ स्वता बुद्धी शिकलिस अथवा, कोणी
चाळविली तूतें ॥ कोण तूझ्या मनास ये
ता. सांग तूं वहिलें, ऐंकें०॥१२॥ एकबा-
पा निश्चया माझा सांगतें तुजशी. प्रा-
णपती हा शंभू मजला करूनि जरि दे-
शी॥ तरीच जिव हा ठेविन देह, गेलें वै-
कुंठासी. ऐं०॥१३॥ आपण आंगीं कैला-
सीं. हिमवंत जोगीला ॥ साष्टांग घालुनि
विनवी देवा. देतों मी इजला ॥ पालग्रहण
अखंड करणें, ह्मणुनि सत्वर उठिला, ऐं०
॥१४॥ गजचर्मांबर व्याघ्रकडासन,

झाडुनि धरली हातीं ॥ विभूति अंगीं चर्चुनि रुंड, माळा हृदयावरती ॥ शुद्ध पादुका चढवुनि चाले. संगें सुरवर येती ॥ चला जाऊं पाहूं ह्मणती. चेला- क्याचा गोंसावी. ऐके०॥१५॥ नाना परिच्चीं वाजति वाद्यें नादें अंबर ग- र्जे ॥ मधुपर्क[1] पूजा करुनी दान, बरवें लग्न झालें ॥ ब्रह्म्यादिकां सुरवरगंध- र्वां, विप्रां[2] पूजियेलें. ऐकें०॥१६॥ हळ- दी उटणें करितां दोघें, हंसुनी पाहती नारी ॥ ऐसा कैसा वर पाहिला, बोलती नानापरी ॥ हिमवंतानें अति संतोषें पूजि- ले नवरा नवरी ॥ घेऊनि गेला पार्वतीसीं बैसुनि नंदीवरी. ऐके. ०॥१७॥ घरभर णीचे गेले दिवशीं, घरांत पाहूं गेली ॥ फुटकीं मडकीं फुटकीं पाळीं, फुटका दगड थाळी ॥ कंथा काठी विभूति भो ळा, खुंटिस[3] ओली झोळी ॥ दिवसा

---

१ लग्नांतील प्रकार. २ ब्राह्मणांस. ३ घोंगडी.

धांवति उंदिर घूंशी, घर चंद्रमौळी, ऐकें० ॥१८॥ इतुकें वैभव पाहुनि अंगीं, हळूच बाहेर आली॥ जिथें तिथं लहान थोर, सर्पाचें वेटाळें ॥ आणिक तेथें नवल देखिलें, भूतें देखोनि भ्याली ॥ धांवत आले शंभू त्यांनीं, हृदयीं आलिंगीली- ऐ० ॥१९॥ भांग तंबाकू हुक्का तक्का, कोठिं विषाचा सांठा ॥ विशाळ पाटा वरवंटा, दारीं नंदी मोठा ॥ गळ्यांत घंटा न भरे पोटा, हिंडे वारे वाटा॥ याची कटकट गिरिजे दृष्टी, जन हे करिती चेष्टा, ऐकें ०॥२०॥ केंशि आलिस एकटि आलिस, कांग आलिस येथं॥ तुझ्यासाठीं सुंदर महाल, केला आहे तेथें ॥ चला जाऊं घराशि आपुले वैभवें पाहुं तेथें- ऐ० ॥२१॥ तिष्ठति सिद्धी तिष्ठति दारीं, तयाशि पुसणें कोणी॥ धनें गोधनें वस्त्राभरणें, अक्षय भांडारेंशीं ॥ गिरिजा गिरिधर

१ अलंकार.

प्रभु कैलासीं, भजतो रामासीं ऐकें साजणी ॥ २२ ॥ ॥ ७ ॥ ७ ॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत एके दिवशीं पार्वती नें महादेवास प्रश्न केला कीं, जेणें करून तुह्मीच मला भ्रतार मिळालेत असें पूर्वी मी काय तप केलें होतें? ती कथा कृपाकरून सांगावी असा पार्वतीचा प्रश्न ऐकून महादेव सांगतात कीं हे पार्वती ती समूळ कथा तुला सांगतों श्रवण कर. तूं हिमालयाची कन्या आहेस व पूर्वी अघोर तप करून शरीर कष्टवून शुष्क पानें खाऊन व्रत केलेंस हें पाहून तुझ्या पित्यास मोठें आश्चर्य वाटलें कीं अशी सकल गुणयुक्त कन्या कोणास द्यावी असा विचार करीत आहे तों नारदानें सांगितलें कीं त्रिलोक नायक जो विष्णू त्यास ही द्यावी व त्या प्रमाणें आई बापांचा निश्चय झालेला पाहून हे पार्वती तुला अत्यंत राग आला व संपूर्ण जप तपादिकांचा त्याग करून तूं सखीसह अरण्यवासास गेलीस नंतर आईबापांनीं नानाप्रकारचीं स्थानें शोधिलीं परंतु कोठेंच तुझा थांग लागेना नंतर एका वृक्षाखालीं

तूं हरतालिका पूजन करीत असतां तुझे आईनें तुला पाहून तिला फार आनंद झाला व तिणें तुझें फार कौतुक केलें व त्या हरतालिका व्रतानें मी भ्रतार तुला प्राप्त झालों व पुढें यथाविधी तुझें माझें लग्न झालें नंतर गृहप्रवेश केला (कैलासास गेलों) तेथें फुटकीं मडकीं व फुटकीं पाळीं व सर्पाचीं वेटाळीं व भुतें इत्यादि पाहून तुला फार भय वाटलें तें तुझें भय मी निवारण केलें त्यानंतर शिव पूर्ण ऐश्वर्यवान असून संपूर्ण सिद्धी येथें दासी होऊन राहिल्या आहेत असें पाहून तुला फार आनंद झाला अशी कथा ह्या गाण्यांत आहे. तर हें व्रत करणाऱ्यास्त्रियांस जन्मो जन्मीं उत्तम सुख मिळतें.

---

## गाणें. २७ वें. नाच कृष्णाचा.

यशोदा माता कृष्णाला विनवीते, येईलवकरी भात कालवीतें॥ खेळ ये कृष्णा तुजला मीरे देतें. उचलोनि बाळा कडे वरी घेतें॥ नको माय तुझा मजला भात, दहीं घातियलें नाहींस गऱ्यांत॥ हार झळकतो

माने तूझ्या गळ्यांत. चित्त माझें सर्वही गुं-
तलें त्यांत ॥ यशोदा माता आलीसे रागांत
उचलोनि नेला टाकिला दारांत ॥ दुसरा ग
हाका मारी घरांत. तिसरा ग रडे तिच्या
आंगणयांत ॥ चवथा ग लोळे तिच्या अं-
गावरी, पांचवा जो कृष्ण खेळतो बाहे-
री ॥ सहावा येवोनी शिंक्यावरी बैसे. सा-
तवा ग लोणी भक्षीतसे ॥ आठवा ग ती
च्या माथणीवरी गेला. नववा जो दहीं
भक्षूं लागला ॥ दाहावा ह्मणे माते म-
जला घेई, अकरावा रांगत तीच्यापा-
शीं येई ॥ बारावा येवोनी कडेवरी बैस-
ला. इतुक्या कृष्णांचा एकचि झाला ॥
हार देतें तुजला मी मुरारी, कवतुक तुझें
पाहीन मी हरी ॥ नाचों लागली हो देवकी
वनमाळी, नाचों लागले हो सवगडे गव-
ळी ॥ नाचों लागल्या हो नऊ लक्षगाई,
नाच माझा माये पाहीलासी कायी ॥ वृद्ध
ह्मातान्या नाचती परोपरी. नाचों लागल्या

हो लहान थोर पोरी ॥ जांतें उखळ नाचती मुसळें, चुलीवरी नाचे खापर काळें॥ नाचती बाजा नाचती बाळंतीणी, कडे घेऊनीयां बाळकें तान्हीं ॥ हार देतें तुजला मी मुकुंदा, नाच क्षणभरी बाळ तूं गोविंदा ॥ नाचती चुली नाचती दुधवणी, नाचों लागल्या हो भाणस विरजणीं ॥ नपेलीं तांब्ये नाचती गलोट्या, नाचों लागल्या हो सांदी कोंदी पेट्या ॥ नाचों लागला हो पाटा वरवंटा, नाचों लागल्या हो नाटकीं वाट्या ॥ नाचती तळीं नाचती कमळीं, नाचों लागल्या हो चांफे नि बकुळी ॥ फुलें नी बागा नाचती माळणी, नाचों लागल्या हो नेलीणी तांबोळणी ॥ हार देतें तुजला मी मुरारी, कवतुक तूझें पाहीन मी हरी ॥ नाचती बावी नाचति ग पाणी, पाणी काढीत होत्या त्या नाचती कामीनी ॥ नाचत नाचत उदकाला येती नारी ॥ त्यांच्या

डोईवरी नाचती घागरी ॥ फडा उभारो-
नी नाचती नागीणी, नाचती पेंठ दु-
कानें बाजार ॥ हत्ती घोडे पालख्या
सुभेदार, मृत्युलोकींचे स्वर्गलोकीं
पाताळ ॥ नाचों लागलें हो आणीक
गोकुळ, हार देतें श्रीहरी आधीं उभारा-
हें. सद्गुरु देवाचे धरितों मी पाय ॥ ॥

तात्पर्य– एके दिवशीं यशोदा कृष्णास विनंती करून ह्मणालीकीं कृष्णा जेवायला ये तुला मी खेळ-णें देतें व उचलून कडेवर घेतें तेव्हां कृष्ण ह्मणाला नको मला तुझा भात त्यांत तूं दहीं घातलें नाहींस. माते तुझ्या गळ्यांत हार झळकत आहे तो मला दे असें ह्मणतांच यशोदेस मोठा राग आला व त्याला उचलून दारांत नेऊन ठेविला व घरांत येते तों तेथें एक कृष्ण आहेच व दुसरा आंगण्यांत रडत आहे अशीं अनेक प्रकारचीं रूपें घेऊन मातेस कौतुक दा-खवित आहे तेव्हां यशोदा ह्मणते कृष्णा तुझी ली-ला पाहून मला फार आनंद झाला तुला मी हार देतें हा घे असें ह्मणते तों कृष्णासहित यशोदाव गवळी

नाचूं लागले त्याचप्रमाणें पुरुष व स्त्रिया लहान थोर व उखळें मुसळें आणि घरांतील सर्व भांडीं व विहिरी नळी त्याचप्रमाणें बाजारांतील दुकानें व झाडें झुडें इत्यादि सर्व पदार्थ नाचूं लागलेले पाहून यशोदेस व सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटून आनंद झाला. अशी. ह्या रसभरित गाण्यांत कृष्णाची लीळा वर्णन केली आहे.

---

## गाणें. २८ वें. अनसूया.

लक्षुमी-सावित्री-गौरी कोणे एके दिवशीं॥ गर्व करूनी ह्मणती चौथी नाहीं आह्मा ऐशी॥ त्रिभुवन स्वामीणी, आह्मी तिघीजणी॥ १॥ तों तेथें मग अकस्मातच आले नारदमूनी॥ गर्व करूनी अती आदरें पुसती त्यालागूनी॥ आह्मा साारख्या, कोण स्त्रिया त्रैलोक्या॥ २॥ वदे नारदहि तुह्मा ऐसें मजला न दिसे कोठें॥ परंतु चित्रकूट पर्वतीं नवल देखिलें मोठें॥ तें मी सांगेन, ऐका चित्त देऊन॥ ३॥

अत्रिऋषीची भार्या[1] नाम अनसूया तीचे ॥रूप-लावण्यं गुणेकराशी काय सांगुं स तीचें॥ऐका आधीक, अनसूया ती एक ॥४॥ तिचे नखाग्रा समान तरि हो तु-ह्मासि कैचें तेज॥बळें हो चडफडतां तुह्मीं यथार्थ कथिलें मज॥ इतुकें बोलूनी गेले नारद मुनी॥५॥विष्णु जगाचा पा-लन कर्त्ता ब्रह्मा तो शंकर॥अनसूयेला छळावयाला देव जाति सत्वर॥ रूपें पा-लटीत, होऊनीं अतीथ[2]॥६॥तिघे जाउ-नी रंपा द्वारीं भिक्षाशब्दा वदती॥फळें घेउनी बाहेर आली अनसूया महासती ॥ह्मणे फळांची भिक्षा घ्या हो स्वामी ॥७॥ नग्न होउनी देशिल भिक्षा तरीच आह्मी घेऊं॥नाहिं ह्मणशिल तर फिरून जाऊं॥सत्व तुमचें नेऊं वेळ न लावा-वी, त्वरीत भिक्षा घालावी॥८॥ अन सूयेनें तिघां जणांचे शिरीं ठेवीला हात॥

१ स्त्री. २ वुरून श्रमून वैश्वदेवकाली जो आलातो.

तात्काळींच हरि-हर-ब्रह्मा बाळें केलीं ते-
थ॥ ऐशी अनसूया, धन्य ईश्वरी माया
॥९॥ अनसूयेनें तिन्ही बाळकें निजवि-
लीं पाळण्यांत॥ भक्ताकरितां वामनकी-
र्ती अनसूया बा गात॥ जो जो नीज बा-
ळा, स्वर्गि लागुं दे डोळा॥१०॥ अरे मुकुं-
दा भक्तासाठीं घेतलास अवतार॥ त्रै-
लोक्याचा पाळणकर्ता भागलास तूं फार
॥ जोजो नीज बाळा, स्वर्गि लागुं दे डोळा
॥११॥ ऐकवि उत्तर परमेष्ठीतें[1] स्थीर
करीं बा चित्त॥ सृष्टी लागीं[2] बा माझारे
भागलासि तूं बहुत॥ जो जो नीज बा-
ळा, स्वर्गि लागुं दे डोळा॥१२॥ अरे शि-
वा तूं संहारकर्ता कैंचा प्रपंच[3] सजणा॥
स्मशानवासी सर्वांगासी विभूत[4] लावी
जाणा जो जो नीज बाळा, स्वर्गि लागुं
दे डोळा॥१३॥ अनसूयेनें तीन्ही मूर्ती
पाळिल्या कितीक दिवस॥ उमा[5]-रमा[6]-

---

१ ब्रह्मदेव. २ जगता करितां. ३ संसार. ४ भस्म. ५ शंकरा
ची स्त्री. ६ विष्णूची स्त्री.

सा[1]वित्री पतिविण शोक बहू करीत॥ जी[2]वना वेगळ्या, नळमकनी मासळ्या ॥१४॥ धरून आह्मी दरिद्रबुद्धी स्वामी लाउनि दीले॥ कोणी आमुचें काय केलें आह्मीच घर बुडवीलें॥ हारपुनी हातींचें, पाय धरिले पळत्यांचें॥१५॥ तों तेथें मग अकस्मात आले नारदमुनी॥ अहो नारदा एकवेळ न्या हो अनसूयेचे भुवनीं॥ मग त्या तीर्घीजणी, चालल्या नारद घेऊनी॥१६॥ दरे-खोरे-गिरी-पर्वतीं फिरतां संकट मोठें॥ पायहि दुखती खडेही खुपती त्यावरि रुतती कांटे॥ ऐसा गळांठा, तिघींचा झाला मोठा॥१७ अंग चीरलें कांटे लागुनि रक्तें उभ्या न्हाती॥ पतीदर्शनासाठीं भुकेल्या दुःखी[3] झाल्या चित्तीं॥ ऐसा अभिमान, हिंडवि रानोरान॥१८॥ तिघींसहित मुनी पातले चित्रकूटपर्वतीं॥ अत्रिऋषीची

१ ब्रह्मदेवाची स्त्री. २ पाण्यावांचून. ३ दुर्दशा.

गुंफा दाउन आपण झाले गुप्त॥ मग त्या तीर्थीजणी, लागती चरणीं ॥१९॥ पुसे अनसूया तयांस तुह्मी कां आलां हो येथें॥ कोणत्यापरी काय आलों संकट हें आह्मातें॥ नको पाहूं निर्वाण, देईं चूडे दान॥२०॥ अनसूयेनें तिन्हीं बालकें उचलुन ठेविलीं पुढें॥ घ्या आपुले गपती ओळखुनि अक्षय राहो चूडे॥ ऐशी अनसूया, धन्य ईश्वरी माया॥ २१॥ तिन्हीं बालकें एकसारखीं ओळखुं येतनापती ॥ चिंताक्रांत होऊनीयां अनसूये विनविती॥ भ्रतार पूर्ववत, करून देईं त्वरित॥ ॥२२॥ अनसूयेनें कमंडलूतुन उदक शिंपीलें॥ तिन्हीं बालकें पूर्ववत् केलीं ज्यांचीं त्यांला दिलीं॥ धन्य निज निष्ठा, पराक्रम हा मोठा॥ २३॥ तेच आपुले स्थानीं जातां वदती तीन्ही देव॥ तिघे बालकें होउनि राहूं हाचि मानसी भाव

१ नवरे. २ आपली. ३ भक्ती.

माने बसावें, स्वसुखीं वसावें ॥ २४ ॥ अंबरदासें ख्याली केसी जैसी अनसूया ॥ त्रिकाळ ओंव्या गातां- जपतां हृदयीं वसो निजलीळा ॥ अनसूयेच्या ओं- व्या, दासीं त्रिकाळ गाव्या ॥ २५ ॥ ॥

तात्पर्य– गर्व कोणीही करूं नये गर्वाचा प- रिणाम फार दुःखकारक होतो हें ह्या गाण्यांत मुख्य लें वर्णिलें आहे. एके दिवशीं लक्ष्मी, पार्वति व सावि- त्री ह्या तिघीं सुरस्त्रियांस मोठा गर्व झाला कीं आ- ह्मासारख्या पतिव्रता, पराक्रमी व शहाण्या स्त्रिया जग- तांत कोण आहेत अशाप्रकारचा अभिमान मनांत धरिला आहे तों त्रिभुवनांत फिरणारे जे महर्षि नारद ते तेथें आले व त्यांचा गर्वी मनोभाव जाणून त्यांच्या पुढें महा पतिव्रता साध्वी अत्रि ऋषीची स्त्री जी अन- सूया तिचें वर्णन केलेलें ऐकून त्यांस मोठा क्रोध आ- ला व आपले पतींस (विष्णु, शिव, ब्रह्मदेव यांस) भूतळीं जाऊन तिचें सत्व हरण करण्याविषयीं फार त्रास दिला व ते स्त्रियांचे मोहांत पडून अनसूयेचे घरीं गेले नंतर त्या साध्वीनें हे कपटी वेषधारी आले

आहेत असें समजून त्यांस लहान बालक केले. इकडे त्यांच्या स्त्रिया चिंतामग्न आहेत इतक्यांत नारदऋषि पुनः आले. तेव्हां त्यांस प्रश्न केला कीं हे नारदा एकदां तिचें घर आह्मास दाखवा ह्मणजे एकवळ पतीचें दर्शन होईल नंतर नारद त्या तिघींस घेऊन अत्रिऋषीकडे गेले. तेथें गेल्या नंतर त्या पहातात तों आपले पति कोठें दिसत नाहींत नंतर त्यांनीं अनसूयेची प्रार्थना करून चुडे दान मागितलें तेव्हां तिनें पूर्ववत पति करून दिले. अशी रसाळ कथा ह्या गाण्यांत आहेत.

---

गाणें. २९ वें, त्रिवेणी.

धन्य त्रिवेणी, तिचें निर्मळ वाहे पाणी॥ ॥ अ० क०॥ माघ मासाचा महिमा थोर॥ करिती स्नानाचे आदर॥ तेहतिस कोटी तीर्थें थोर॥ ठिकाणीं, तिचें०॥ धन्य० ॥१॥ माघ मासाचा महिमा दावा॥जन्म मृत्यु नको रे देवा॥ आपुल्या चरणीं

---

१ गौरवपूर्वक सत्कार. २ दाखवा. ३ पायीं.

ठाव द्यावा ॥ ह्मणती प्राणी, तिचें० ॥ ध-
न्य० ॥ २ ॥ अक्षयवटाचा थोर महिमा ॥
कितिरे वर्णू मेघश्यामा ॥ ते हतिस कोटी
देव येउनी ॥ लागति चरणीं, तिचें० ॥ ध-
न्य० ॥ ३ ॥ अक्षयवटाचे एकच पाना ॥ नि
द्रा केली अ[1]नंतसेना ॥ ते हतिस कोटी देव
येउनी ॥ लागति चरणीं, तिचें० ॥ धन्य०
॥ ४ ॥ देह कर्वतीं घालीती ॥ त्यांच्या पुं-
ण्या नाहीं गणती ॥ गंगा-यमुना-सर-
स्वती ॥ संगम तीन्ही, तिचें० ॥ धन्य० ॥ ५ ॥
ज्या ना[2]री करिती वेणी दान ॥ पतीचें
मांडीवर बैसून ॥ त्यांशीं लागे अगा[3]ध
पुण्य ॥ देतां वेणी, तिचें० ॥ धन्य० ॥ ६ ॥
माधवरायाचें दर्शन ॥ मुक्ती-मोक्षाचें
साधन ॥ आपुले चरणीं ठाव द्यावा ॥ ह्म-
णती प्राणी, तिचें निर्मळ वाहे पाणी ॥
धन्य० ॥ ७ ॥ ॥ ध्रु ॥ ॥ ध्रु ॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत प्रयागांतील गंगा,

१ हे देवा. २ स्त्रिया. ३ मोठें.

यमुना, सरस्वती या नद्यांच्या संगमस्थानाचें माहात्म्य वर्णन केलें आहे. माघमासीं येथें फार दूर देशाहून वगैरे यात्रा येते येथें एक वट वृक्ष आहे त्याचे एका पानावर, महा प्रलय कालीं बालमुकुंदमूर्त्ती राहाणार असें पुराणांतरीं वर्णन आहे. ह्या तीर्थावर नायकानीं नवऱ्याचे मांडीवर बसून आपली वेणी तीन बोटें पर्यंत कापून द्यावी लागते द्राविड वगैरे लोकांच्या स्त्रिया सगळ्या वेणी देतात. असें ह्या तीर्थाचें माहात्म्य आहे.

---

गाणें. ३० वें, बेलबाग.

सिंहासनावर उभी राहिली चतुर्भुज नारायणमूर्ति ॥ वामांगीं लक्ष्मी उभयतां दृष्टि समोर गरुडावरती ॥ दोहीं मूर्तिंचे ध्यान-दर्शनें जन्मार्जित[1] पापें[2] हरती ॥ निष्कामत्वें चरण सेवितां अभ्यंतर[3] हे तृप्त होती ॥ ईशान्येसीं गौरी शंकर आग्नेयेस मंगलमूर्ति ॥ रवि-अंबेची रि-

---

१ जन्मांत साचलेलीं. २ पाप ३ मनांतील.

कामि जागा राहिली वेदीवर्ती ॥ कथा-
कीर्तनें-पुराणश्रवणें होतसे नित्य वेदांत
॥ नानांनीं बेलबाग बांधुन स्थापियले ल-
क्ष्मीकांत ॥१॥ शहर पुण्यामधिं भर बुध-
वारांत स्थान पाहिलें एकांत ॥ नानांनी०
॥ अं०क०॥ वाम[1] भुजेमधिं शंख-सुदर्श-
न-गदा-दक्षिणीं[2]-पद्म[3]-कळा ॥ मस्तकीं
चकचकाट किरीटी[4] कपाळिं केशार कस्तु-
रि टिळा ॥ अंगावरची उटी केशरी दोनि
मूर्तिंची शुभ्र शिळा ॥ तऱ्हे तऱ्हेचीं फुलें
गुंफुनी गळ्यांत तुळशीहार काळा ॥ प्र-
तिवाराचा प्रति रंगाचा करिती पोशा-
क घननीळा ॥ कानामध्यें कर्णभूषणें
कंठीं रत्नांकित माळा ॥ नाभिकमळिंचें
पदक चमकतें जसा रवी आकाशांत
॥ नानांनीं०॥२॥ कज्जल[5] नयनीं[6] रजनीं[7]
वदनीं[8] कपाळीं कुंकूं लाल चिरी ॥

---

१ डाव्या हातांत. २ उजव्या हातांत. ३ कमळ. ४ मुकुट.
५ काजळ. ६ डोळ्यांत. ७ रात्रींस. ८ तोंडीं.

भ्रुकुटिमधें कस्तुरी चंद्रमा भांग चर्चि-
ला शेंदूरीं ॥ नथ-काप-बुगड्या-भोंकर
बाळ्या-मूद-राखडी-बोरकुयरी ॥ शि
सफुल-गोंडे-नाग-आंवळा-केतक-
केवडा-चंद्र-कोरी ॥ मंगळसूत्र-चंद्र
हारलप्फा-नन्मणि-पोंत-सरी ॥ बांकी-
वेळा-गोट-पाटल्या-छंद विंदल्या-तो-
डे करीं ॥ सांखळ्या-तोरड्या-जोड विं-
विरवल्या-लक्ष्मीदेवीच्या चरणांत ॥ ना-
नांनीं० ॥ ३ ॥ घंटानादें भ्रमराकारें कर्पुर-
धूप-दीप स्कवासी ॥ पंचामृताचीं पात्रें
भरुनियां तार्टी नैवेद्य षड्रसीं ॥ चंदन-
श्रीफल-तांबुल-गजरे-अत्तर-पाणी
स्वादासी ॥ प्रदक्षिणा दक्षिणा नमूनी
पुष्पांजळिला फुलें-तुळशी ॥ कुंचे-चौ-
मर-व्यंजनें-दर्पण-नंदादिप सुख शा-
य्येसी ॥ वर्षामध्यें तीर्थ पर्वणी कीर्तन-

१ भिंवया. २ भुंग्या प्रमाणें. ३ मोरचल. ४ चौ-
री. ५ पंखे. ६ आरशी.

जाग्रण-एकादशी ॥ लक्ष्मीकांना निद्रा करावी स्वस्थ शयनावर नीवांत ॥ नानांनीं० ॥४॥ कार्तिकमासीं प्रतिवार्षीकीं प्रतिदिवसाचा परिपाठ ॥ पटांगणामध्यें चोंकटि भोंवते दीप बहू लखलखाट ॥ छतें कोंदणीं सभामंडपावरि कंदिल समया दाट ॥ इकडे गाणें-घडयाळ-वाद्यें तिकडे वाजंत्री कडकडाट ॥ द्विजादिकांची इकडे दाटी तिकडे नारींचा थाट ॥ इकडे लहरीपाणी-कारंजीं तिकडे नंदी-आड-रहाट ॥ बंदोबस्त कडिकोट इकडे तिकडे चौकी द्वारांत ॥ नानांनीं० ॥५॥ ना थोडी ना अफाट जागा टुमदुमेची हवागिर ॥ बकुळीसदें अशोक-उंबर-इमारतींचा शेजार ॥ कौलारांच्या छपरांमध्यें लांडोरी आणि मयूर ॥ पूर्वद्वाराकडे रस्त्यांत दुथडी बहार बाजार ॥ प्रदक्षिणेच्या वाटे भोंवतीं

---

१ ब्राह्मणादिकांची. २ स्त्रियांचा.

द्राक्षी मंडपांची बहार ॥ नारळी-आं-
वळी-फुल झाडें-तुळशी-बेल तरुवर
अशा प्रकारची मानसमूर्ति मनोहर क-
र्यी हृदयांत ॥ नानांनीं० ॥ ६ ॥ ७ ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत नाना फडणवीस
ह्यांनीं बेलबाग नामक बागेंत श्री लक्ष्मीनारायणा-
च्या मूर्तीची केलेली स्थापना व तन्निमित्त पूजा, नैवद्य
व प्रति कार्तिक मासीं होणारा उत्साह इत्यादिकांचें व-
र्णन केलें आहे. नाना फडणवीस हा जगत्प्रसिद्ध व
राजमान्य पुरुष अतिधरंधर होऊन गेला याची अ-
द्यापि ख्याति आहे.

---

## गाणें. ३१ वें. योगी.

योगि ह्मणावा जरि या हरिला कुटुंब या-
ला बहु कसा ॥ कुटुंबि ऐसा जरी ह्मणा-
ल तरि ब्रह्मचारि हा पडेल ठसा ॥ अ-
रूप ह्मणावा तरि धर्मागृहीं उष्टीं काढी
पहा कसा ॥ सख्या जनाचा मित्र ह्मणाल

---

१ वृक्ष. २ रूपरहित.

तरि मातुळ[1] वधिला शत्रु जसा ॥ सखा मातुळ-बंधु[2] बंधु वधिला धांवे भक्ताच्या निर्वाणा ॥ १ ॥ अनंत रूपें अनंत नामें नकळे शेषाला महिमा ॥ काय ह्मणावें या या हरिला नसे कशाला ठिकाणा ॥ अ० रू० ॥ उदार ह्मणावा तरी बळीपुढें हात दानाशीं[3] पसरीला ॥ कृपण ह्मणावा तरी ध्रुवाला मान्य पदाशीं स्थापिला ॥ कठोर ह्मणावा तरी गजेंद्रा पशुसाठीं तो गडबडला[4] ॥ कोमल अंतःकरणी ह्मणाल तरि मयूरध्वज उभा खंडिला ॥ बहू थोरला जरी ह्मणाल तरि करि यशोदास्तनपाना ॥ अनंत० ॥ २ ॥ शूर ह्मणावा तरी लपाला काळयवनाच्या पुढें ॥ किशोर[5] ह्मणावा तरी रणामधिं दैत्य मारिले बहु गोंढे[6] ॥ श्रीमंत

---

१ मामा. (कंस) २ शिशुपाळ. ३ वामन अवतार. ध्रुवचरित्र. गजेंद्रमोक्ष वगैरे चरित्रें येथें दृष्टांतार्थ घेतलीं आहेत हीं सर्व वाचण्यासारखीं आहेत ४ घाबरला. ५ बालक. ६ मोठे.

ह्मणावा तरि कुब्जेच्या झोंपडीमध्यें सु[1]रवाडे ॥ दुबळा-घानकि जरी ह्मणाल तरि चंद गाती पोंवाडे ॥ भला ह्मणावा तरी घालितो गोपींभोंवती धिंगाणा ॥ अनंत० ॥ ३ ॥ कर्पाट ह्मणावा तरी जिवींचें गूज मागतो पार्थाला[2] ॥ कोमल अंतःकरणी ह्मणाल तरि दगेवसवितो दुष्टाला ॥ गाई राखितो गवळी ह्मणाल तरि द्रौपदीसाठिं चोटी[3] झाला ॥ चोटि ह्मणाल तरि बाइल होउनी शयनीं पार्थाच्या पहुडला ॥ रामचंद्र ह्मणे सर्वहि याला साधुमात्र जाणती खुणा ॥ अनंत० ॥ ४ ॥

तात्पर्य- त्या गाण्यांत श्रीकृष्ण परमात्म्यास कांहीं उपमा देऊन तो असा आहे ह्मणून जीं जीं नांवें कवीनें त्यास योजिलीं त्या प्रत्येक नांवास व्यत्यय आला तेव्हां परमात्मा अनुपमेय आहे असें ह्मणून कवीनें स्तुति पुरी केली.

---

१ रमे. २ अर्जुनास. ३ कापडकरी.

गाणं ३२ वें. शांभवी.

पंचभूतांचे स्वामि तुह्माहुनि श्रेष्ट कोण त्रिभुवनीं ॥ व्याघ्रांबर परिधान करुनियां बैसतां मृगासनीं ॥ नर-किन्नर संकटीं सुरासुर तुह्मांसि ध्याती मनीं ॥ नवल मला वाटतें शंकरा वृत्ति पाहुनि लोचनीं ॥ बोलविनां मसि कां हो न बोलां तुह्मी गर्वांदिनीं ॥ जटाभार मुख चंद्रावरिला आवरुनि तुह्मी हरा ॥ ध्यान कुणाचें करितां सांगा त्रिपुरांतकसुंदरा ॥१॥ भस्मभूषणा-मदन शोषणा-पशुपति-गंगाधरा ॥ ध्यान० ॥ अ० क० ॥ प्राणवल्लभ एक अपर्णे मायामय चाळकें ॥ रामसखा हृदयांत ध्यातसें हिमनगात्मिरबालके ॥ झालें दाम्याहरु शीतल नामें सकलविश्वपालकें ॥ ब्रह्मादिकांच्या स्वाम

१ पृथ्वी. आप. तेज. वायु. आकाश हीं पंचमहाभूतें. २ स्वर्ग, मृत्यु, पाताळ. ३ वाघाच्या कातड्याचें वस्त्र. ४ मनुष्य. ५ देवयोनिविशेष. ६ देवदैत्य. ७ डोळ्यांस. ८ पार्वती.

नणासी[1] तूं राम कालिके॥ राक्षसादिकानन[2] वैश्वानर दानव[3] निर्दाळिके॥ सूर्यवंशिंचा मुगुटमणी तो त्रिविध[4] तापहारके॥ ध्यान तयाचें करितों जपतां राम सगुणमंदिरा॥ देव बंदिचे सोडवील तो वधुनी दशकं[5] धरा॥ भस्म०॥ २॥ हरा त्रिनेत्रा परम पवित्रा रामलिला वर्णितां॥ क्षणांत त्या रामाला भुलविन एक पळन लागतां॥ जानकीरूपा धारण करुनी चमके विद्युल्लता+॥ त्याहाळीत आहे रघुपति तिकडे मुख मुरडी चालतां॥ बद्ध[6]पाणि तो बंधु सुमित्रा[7]स्तन झाला विनता॥ फुलांसि आली, कसी जानकी स्फटूनि आला हातां?॥ रामचंद्र ह्मणे नव्हे जानकी पहा त्यहाळुनि स[8]होदरा॥ सत्व ध्या[9]वया कैलासाहुनि गिरिजा आलि भूधरा॥

---

१ अरण्य. २ अग्नि. ३ दैत्य. ४ तीन प्रकारचे ताप (आधिदैविक, आधिभौतिक, अध्यात्मिक) हरणकरणारी. ५ रावणा. ६ हात जोडून. ७ सुमित्रेचा मुलगा. (लक्ष्मण) ८ बंधुराया. ९ लक्ष्मण. + वीज.

भस्म० ॥ ३ ॥ तूं कां आलिस वनीं वृथा तरि आजि कैलासाहुनी ॥ पद्दा निर्जरांमधें नसे कुणी श्रेष्ठ सांबाहुनी ॥ आह्मी करूं वनवास अयोध्यापुरी नीत्यागुनी ॥ जन्मकाळीं मुळिंच ठेविलें चतुर्मुखें निर्गुनी ॥ राम-लक्ष्मण जाते झाले सुवर्ण लंकापुरा ॥ मागे प्रभाकर ह्मणे साह्य व्हा तुह्मी अहल्योद्धारा ॥ भस्म० ॥ ४ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

तात्पर्य- श्रीरामचंद्र वनवासांत सीताविरहामुळें अति दुःखित होऊन तिच्या शोधार्थ फिरत आहेत. अशा प्रसंगीं पार्वतीनें शंकरास प्रश्न केला कीं. आपण सर्वेश्वर असून ध्यान कोणाचें करितां? तेवेळीं सांगितलें कीं मजहून श्रेष्ठ जो रामचंद्र त्याचें ध्यान करितों तेव्हां पार्वती ह्मणाली. तो अति स्त्रैण आहे कारण कीं हा सीते हा सीते अशा प्रेमयुक्त करुणास्वरानें सर्व अरण्य रात्रंदिवस फिरत आहे त्याला मी एक क्षणांत भुलवून आणितें अशा प्रतिज्ञेनें

---

१ ब्रह्मदेवानें.

सीतेचा वेष धरून गेली नंतर ती लक्ष्मणाच्या दृष्टिगोचर होतांच लक्ष्मण ह्मणतो हे रामा ही पहा सीता आली आतां शोक कशाकरितां करितां ? तेव्हां रामचंद्र ह्मणतात अरे ही कैलासवासी जगदंबिका. पार्वती ती ही. असें ह्मणतात तों ती पुढें आलेली पाहून रामचंद्र ह्मणतात मातोश्री आपण एवढे श्रम काबरें घेतले ? विधिनें आमच्या कपाळीं लिहिलेलें आह्मास भोगिलेंच पाहिजे असें ह्मणून लंकेच्या मार्गानें पुढें चालते झाले. व पार्वती मनांत अति खिन्न होऊन मागें फिरली.

---

## गाणें. ३३ वें. धांवा द्रौपदीचा.

श्रेष्ठ श्रेष्ठ सभेमाजि बसले भीष्म-द्रोण महामुनी॥ कृपाचार्य-विदुरादिक अवघे सभ्यहि[१] सजले गुणीं॥ सती बोलली आज कशी मी पडलें दुर्व्यसनीं[२]॥ कर्ण-शकुनि-दुर्योधन-दुर्जन पाहुनि हर्षति मनीं॥ माझ्या पतींचा भरंवसा परिते

१ सभासद. २ मोठ्या संकटांत.

दिसती दिन वदनीं ॥ पराक्रमी परवच-
निं गुंतले नटळति सत्वागुणी ॥ चाल॥
" अरे हरी रे " सभा दिसते मज कशी॥
" अरे हरी रे " व्याघ्रांची मंडळि जशी॥
" अरे हरी रे " मधिं हरणी वेढली कशी
॥ ज्ञान बुद्धिनें स्तब्ध राहिले ज्ञशिं चित्रें
भिंतीवरी ॥ पहा दुष्ट दुःशासन धरुनी
माझि ओढिती निरी ॥ १ ॥ धांव पाव
श्रीहरी दयाळा निद्रा आलि तुज क-
शी ॥ पहा दुष्ट दुःशासन धरुनी ओ-
ढितो केशीं मसीं ॥ अ० क० ॥ कर्ण ह्मणे
ग ऐक सुंदरी बस बस अंकावरी[1] ॥ पट्ट[2]-
महीषीराणी होउनी सुख भोगीं झडक-
री ॥ क्रोध न आवरे विवृद्ध[3] होउनि भीमा
चे अंतरीं[*] ॥ अधर[4] आंवळुनि दांत खा-
तसे गदा मुष्टिनें धरी ॥ मेघ गर्जना करी-
त उठला भीम पहा झडकरी ॥ सत्वशिरो[5]-
मणि धर्म वदे तैं गदा आपिं मम शिरीं ॥

१ मांडीवर. २ मुख्य राणी. ३ अतिवाढलेला ४ ओंठ. ५ सत्यानें केवळ मुगुटमणी. * मनांत.

॥ चाल ॥ " अरे भिमा रे " सत्य दोष कुंतीसुता ॥ " अरे भिमारे " सरसुं नको मख्या सर्वथा ॥ " अरे भिमारे " धरिं साधु जनांच्या पंथा ॥ शांति बुद्धि धरिं क्रोध सिंधुची सीमा तूं परिहर्ग ॥ पहा दुष्ट० ॥ धांव पाव० ॥ २ ॥ क्रोधसिंधुचा लोट न आवरे सहदेवा मज आतां ॥ कुलिप्त होउनी काळ अग्नि हा जळे धर्मदयिता ॥ राज्यहानी वैभव हानी दुःख नाही तत्वतां ॥ गदा उचलिली भद्रजाति नें विजयें धरिले हातां ॥ चाल ॥ " दुर्मती रे " जागृत न होशी कदा ॥ " दुर्मतीरे " भोगिशी तूं संपदा " दुर्मती रे " मम शाप न टळे कदा ॥ ज्ञानबुद्धिनें स्तब्ध राहिले जशिं चित्रें भिंतीवरी ॥ पहा दुष्ट० ॥ धांव पाव० ३ ॥ दुष्टबुद्धिचा दुर्योधन उघडी जानु करुनि दाविली ॥

---

१ गा मु ज्या मार्गानें गेला त्या मार्गा. २ सागर हाच एक समुद्र ३ वाईटानें लिप्त. ४ धर्मपत्नी. ५ गजरूपी श्रीमानें. ६ अर्जुनानें. ७ मांडी.

ये बस मांडीवरि पांचाळी ये तुज भूल कां पडली ॥ प्रळयीं वीज कडकडे जशी तशि ती सती मनीं धडकली ॥ अंकि बसां कीं तुझ्या दुरात्म्या भीमकरीं जी निरवली ॥ सगुणगुणी ही गदा नोवरी वाग्निश्चयें तुज नेमिली ॥ रणमंचकीं करिं निद्रा आतां स्त्री घेउन आपुली ॥ ॥चाल॥ "धीर धरा हो" ईश्वरी कौतुक कसें ॥ "धीर धरा हो" महा संकट वारिल कसें ॥ "धीर धरा हो" उद्धरिलं गजेंद्रा कसें ॥ दुर्योधन क्रोधाग्नि चेतला ह्मणे नग्न हिस करीं ॥ पहा दुष्ट० ॥ धांव पाव० ॥ ४ ॥ झालि निराशा सर्वांची ये यदुपति सोडिव मला ॥ नेत्र लाउनी द्वारवतिवरीं मनोदूत[2] धाडिला ॥ जागृत होउनि वाहन सोडुनी हरि कैसा पावला ॥ कैवारी जगदीश सतीवर पीतांबर झळकला ॥ "यादवानें"

---

१ स्वाधीन केलेली. २ मन हाच दूत.

पाहूनि हर्षली गोरटी ॥ "यादवानें"
पाहुनी निवाल्या नृपदृष्टी ॥ "यादवाते"
धर्म ह्मणं कोण कीरीटी ॥ राम-कृष्णा-
हरि सभेशिं येतां निर्भय द्रुपदकुमरी[1] ॥
पहा दुष्ट० ॥ धांव पाव० ॥ ५ ॥ ७ ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत दुर्योधनाच्या सभेंत द्रौपदीस नेली व तिचा नानाप्रकारें छळ केला आणि दुःशासनानें तिचें वस्त्र हरण करण्या करितां तिरीस हात घातला तोंच तिनें करुणारूपी दीर्घस्वरानें श्रीकृष्णाचा धांवा केला तव्हां कृष्णपरमात्म्यानें जवळ येऊन तिला पायांवर नमविला त्यावेळीं सर्व सज्जनांस आनंद झाला. इत्यादि अति रसभरित कथा आहे.

---

गाणं. ३४ वें. बोध.

भवनदी[2] ही आहे कशी ग मायामोहिनी ॥ दारा-कन्या आणिक सुत हे व्याहि आणि विहिणी ॥ काका-मामा मिळुनी अवघे भाऊ आणि बहिणी ॥

---

१ द्रुपदराजाची मुलगी-(द्रौपदी). २ संसारहीचएकनदीअशी.

पहा कसें हें भवन बुडविलें, इतक्या जणांनीं ॥ १ ॥ मना सज्जना बोध धरावा क्षणभंगुर देहीं ॥ हरिनामाची पेंठ घेउनी भवनदि पार होईं ॥ अ०क० ॥ पैका दिव्य बायकास्कंदर मंदीर ॥ सात खणांची माडि बांधिली शोभिवंत घर ॥ रंगित पिंजऱ्यामधें बोलती मंजूळ कीर ॥ हत्ती-घोडे-उंट-पालख्या लटकाच भूभार ॥ मना० ॥ २ ॥ ह्मणशिल आपुल्या लेंकी-सूना आपुलें नव्हे कोणी ॥ अमोल आयुष्याच्या अंतीं जाशिल टाकूनी ॥ अनन्यभावें भक्ति करावी ईश्वराचे चरणीं ॥ ऐसें करशिल तरीच त्याणें होइल पापधुणी ॥ मना० ॥ ३ ॥ पुण्य टाकुनी पाप करीशी पहा केवढें धाडस ॥ परद्रव्याशीं हरण कराया मनास उल्लास ॥ परस्त्री पहातां दृष्टीं त्याणें तुझा होइल नास ॥ इतुक्यासाठीं सर्व सोडुनी होईं

हरिदास॥ मना०॥ ४॥ अंतिं कडाका
आहे मोठा यम करील जाचना॥ देहा
टाकुनि आंतिल मुरव्या नेतिल पांचां[1]-
जणां॥ चित्रगुप्त[2] हा उभा राहुनी सांगे
पाप-पुण्या॥ तरिबा प्राण्या सावध हो-
ई हरिचरणीं ठेविं मना॥ मना०॥ ५॥

तात्पर्य-- हें गाणं बोधपर आहे. ह्यांत, संसार केवळ मिथ्या आहे. काका, मामा इत्यादि आप्त व हत्ती, घोडे, पालख्या इत्यादि सर्व वैभवें नाशवंत असून अंतीं ह्यांतून कांहीं उपयोगीं पडणार नाहीं व चांगलें कर्मच बरोबर येईल. वाईट कर्म भोगल्या वांचून सुटणार नाहीं. असें वर्णिलें आहे. अशास्तव निरंतर परमेश्वराचे नामाकडे व ध्यानाकडे लक्ष्य वळीव असा उपदेश प्राण्यास केला आहे.

---

## गाणें ३५ वें. सीतास्वयंवर.

लागला छंद मम देहीं ग सरवये बाई॥

---

१ पंच प्राणांस. ( प्राण अपान व्यान उदान समान. )

२. पाप पुण्याचें लेखन करणारा. ( यमाचा चिटणीस )

रामाविण नरुचे कांहीं ॥ अ० क०॥ व-
र्णिलें सीतास्वयंवर हर्षशोकाचें, रामा
विण वाल्मीकाचें॥ छपन्न देशचे भूप
मिळुनि जनकाचे. मंडपीं बसुनि कन-
काचे॥ मस्तकीं डोलतें छत्र एकेकाचे.
सांगुं मी किती आणिकांचे॥ चाल॥प-
त्रिका धाडुन आणिले॥ ऋषि सर्वहि
गोळा झाले॥ श्रीराम-गाधिज आले॥
मंडपींच घनवटले॥ उठाव॥ एके ठायीं,
भेरी घाई॥रामाविण०॥लागला०॥१॥
एक सखी धरुनि हस्तकीं जानकीस
सांगे, कीं रुचेल तुज हा नृप गे॥ पैल तो
कुसंबी साज करुनि बसला गे, जान
की ह्मणे तो नलगे॥ चाल॥ तो जडित
सुधांचा, नव्हे॥ पांघुरला शाल तो, नव्हे
॥ मंदील शिरीं तो. नव्हे॥ उठाव॥ ऐसें
बाई, न पडे कांहीं॥ रामाविण०॥लाग-
ला०॥ २॥ घातिला झगा सोडिले जराचे

१ विश्वामित्र- २ जमले. ३ दुंदुभि-मोठा नगारा.

सांगे, जानकी ह्मणे तो नलगे ॥ तो कोमलांग मृदु गोष्टि मजेनें सांगे, जानकी ह्मणे तो नलगे ॥ तो एक सेवका घडि घडि विडिया[1] मागे, जानकी ह्मणे तो नलगे ॥ तो रामचंद्र घननीळ उभा ऋषिमागें, जानकी ह्मणे तो लागे ॥ चाल ॥ तें सीता अंतरीं[2] फिरली ॥ चित्तवृत्ति रामीं मुरली ॥ आनंदें अतिशय भरली ॥ उठाव ॥ घडीं घडि पाहीं, झुरतें बाई ॥ रामाविण० ॥ लागला० ॥ ३ ॥ जुंपिले मत्तगज[3] शिवधनु[4] कवणा नढळे, बहु कष्टें धनु उभें केलें ॥ जनकाचा पण जो धनु भंगिल स्वबळें, त्यासी अर्पिन मी निजबाळें[5] ॥ हें ऐकुन सर्वहि भयकंपित झाले - सकळांनीं मौन धरिलें ॥ चाल ॥ हें ऐकुन जनकबाळी ॥ बहु अंतरिं घाबरि झाली ॥ धांव पाव

---

१ विडे. २ मनांत. ३ माजलेले हत्ती. ४ शंकराचें धनुष्य. ५ आपल्या मुलीस.

चंद्र[1] मोळी ॥ करीं यांचीं वदनें काळीं ॥ उ-
ठाव ॥ आजच्या समयीं, यश मज दे-
ई ॥ रामाविण० ॥ लागला० ॥ ४ ॥ हा मेला
दशकंठ मी यानें नवरीं, मी रामाची न-
वरी ॥ ह्या माझ्या शरीरांत प्राणजोंवरी,
मी प्राप्त नव्हे तोंवरी ॥ चाल ॥ रामाला
टाकुन मातें ॥ जरि दिधलें दशवदनातें ॥
तरि सोडिन ह्या प्राणातें ॥ उठाव ॥ उडी
लवलाहीं, घालिन डोहीं ॥ रामा[2]विण० ॥
लागला० ॥ ५ ॥ तंव तिकडे दशानन[3]
धनू ओढि तो वेळा, अवचीत उताणा
पडला ॥ गजबजलि सभा आकांत ए-
कचि झाला, भूप तो अधोमुख झाला
॥ चाल ॥ कशी निर्वीर झाली धरणी[4] ॥
पृथ्वीवर नाहीं कोणी ॥ हें ऐकुन राम
श्रवणीं[5] ॥ उठाव ॥ उठ लवलाहीं, नम्र-
च पाहीं ॥ रामाविण० ॥ लागला० ॥ ६ ॥
गजभारांतुन केसरी[6] जैसा, श्रीराम

१ शंकर. २ तोंड. ३ रावण. ४ पृथ्वी. ५ कानीं. ६ सिंह.

ऊठला जैसा॥ इक्षुदंडापरि कोदंड वक्ष-
स्थळिं तोषा. लोळतांचि नावरि केशा॥
रामचंद्र कोमलतनु धनु भंगिल कैसा,
जनकाचा पण कीं ऐसा॥ चाल॥ हा वै-
रि नव्हे हा पिता॥ कां अपयश घेतो मा-
थां॥ कां देइना मज रघुनाथा॥ उठाव॥ देतां
कांहीं. लांछन नाहीं॥ रामाविण०॥ ला-
गला ०॥ ७॥ इक्षुदंडापरि कोदंड घेतलें
मुष्टीं, पाहतांति अवघे दृष्टीं॥ ओढितां-
चि कडकड-घडघड झाली मोठी, ना-
दवली आकाश सृष्टी॥ इतुकें ऐकुनि
जानकि लागीं आनंद पोटीं, मुक्तमा-
ला घातली कंठीं॥ चाल॥ जाऊन बैसे
रामा धांगीं॥ बहु आनंद जनका लागीं॥
नाहीं सामावे त्रिजगीं॥ कवि जनार्दन
त्या रंगीं॥ उठाव॥ जडला पायीं. ठेउन
डोई॥ रामाविण नरुचे कांहीं॥ लाग-
ला०॥ ८॥ ॥ ६२॥ ॥ ६९ ॥

१ उंसासारखें. २ धनुष्य. ३ हृदयीं. ४ आनंदास. ५ कंस.

**तात्पर्य**- ह्या गाण्यांत जनकराजाचे घरीं झालेल्यासीतास्वयंवराचा उत्साह वर्णिला आहे. ह्यांत स्वयंवरास आलेल्या राजांचें वर्णन व सीतेची श्रीरामासच वरण्याची उत्सुकता, रावणाचे उरावर धनुष्य पडल्यामुळें फजिती, आणि रामानें तें त्र्यंबक धनुष्य मोडल्या नंतर सीतेनें त्याचे गळ्यांत माळ घातली इत्यादि सुरस कथा आहे.

---

गाणें. ३६ वें, विराध राक्षस.

वृक्षवाटिका[1] झाडें पुष्कळ. मनुष्यनच वाटे ॥ कोमल चरणीं रक्त वहातें.मोडति बहु कांटे॥ जिकडे तिकडे व्याघ्र आस्थली,दिसती अहि[2] मोठे॥ वराह[3]-मृग[4]-खग[5]-गवे-लांडगे, पाहुन उर फाटे॥ हाय हाय ती करी जानकी[6],नेत्रीं जळ लोटे॥ अशांत मागें येउन विराधहि. राक्षस मग भेटे॥ अंतकाळिंचा काळ जसा तो,त्यापरि तिस दिसला॥ १॥ घोर

१ वृक्षपंक्ति. २ सर्प. ३ डुकर. ४ हरिण. ५ पक्षी. ६ रामाची स्त्री.

भयंकर निर्जन विपिनीं, राम पुढें झाला ॥ लक्ष्मण-सीता मागुनि येती, देखत घननीळा ॥ अ०क० ॥ नरमांसा तो सदां भक्षुनी, पुष्टचि करि काया ॥ हातीं मुद्गल फार ओरडे, नाचुनि थयथय्या ॥ जानकीस तो ह्मणे सुंदरी, हिंडशि वनिं वांया ॥ चाल गृहाप्रति आजिच राहें, होउनि मम जाया ॥ इतुकें बोलुन वाहे स्कंधीं, जनकाची तनया ॥ पळे घेउनी सीता राक्षस, सोडुनि तो न्याया ॥ ह्मणे जानकी धांव राघवा, सोडविं अबलेला ॥ घोर० ॥ २ ॥ ममता कां हो आज टाकितां, सोडुनि मज रानीं ॥ प्राण विसाव्या पुढें चालतां, साधुनियां हानी ॥ वनीं विसावा तुह्मा राघवा, सीतासुखधामीं ॥ रघूत्तमा मज किमर्थ वरिलें, शिवधनु भंगूनी ॥ पडतें

---

१ रानांत. २ देह. ३ स्त्री. ४ खांद्यावर. ५ मुलगी. ६ थकलेला. ७ सीता हेंच एक सुखाचें गृह तेथें.

पायां मला सोडवा, राक्षस मारूनी ॥ सौमित्रातें ह्मणे भाउजी, लावा पतिचरणीं ॥ शब्द ऐकतां राम धनुष्या, घेउनि पुढें झाला ॥ घोर० ॥ ३ ॥ राम ह्मणे राक्षसा सोडुनी, जानकि जाना रे ॥ अति सकुमारा बहू जानकी, व्यर्थचि छळितां रे ॥ अपराध हे क्षमाच केले, दुःखहि जरि भारी ॥ ह्मणे विराधी वन हें माझें, कोण मला मारी ॥ लक्ष्मण बोले उशिर कशाला, मारा अविचारी ॥ भुईवर ठेउनि सीतेस राक्षस, युद्धचि निर्धारी ॥ भालचंद्र कवि विराध कथिला व्यर्थचि तो मेला ॥ घोर० ॥ ४ ॥ ॥

तात्पर्य- ह्या गाण्यांत श्रीरामचंद्र, लक्ष्मण व सीता ह्यां सह वनवासास गेल्या नंतर पहिल्यानेंच त्यांस विराध राक्षस भेटला तो सीतेस खांद्यावर घेऊन पळूं लागला. तेव्हां सीतेनें फार शोक करून रामास ह्मणाली कीं तुह्मी महा पराक्रमी

१ लक्ष्मणास.

शिव धनुष्याचा नाश करून मला वरिलें आतां त्या दुष्ट राक्षसा पासून सोडवीत नाहीं हें मोठें आश्चर्य! इत्यादि करुणायुक्त सीतेचे शब्द श्रवण करून व राक्षसास पराभवून सीतेस मुक्त केलें इ० कथा आहे.

---

गाणें. ३७ वें. चुटका.

अमोल काया[1] जाइल वायां जसी काचडी फुटे फट्‌कन॥ उभा काळ सन्निध लक्षितो होईं प्राण्या सावध झट्‌कन॥ अक्कल कडवें॥ कृतत्रेतद्वापारीं[2] होती आयुष्याची बहु भरती[3]॥ कलि माजी शत वर्षे नेमिलीं तीं ना होती बा पुरतीं॥ बारा-चवदा-पंधरा-विंशति[4]-पंचविसांमधिं किति मरती॥ मागें मेले पुढेंहि मरतिल कोण करिल यांची गणती॥ आजा-काका-मामा मेले यांची साक्षी घ्या चित्तीं[5]॥ त्यांच्या शोकें दुःखित मानस शेवटिं तुमची हीच गती॥ देह आपुला जाइल वायां धरा सोय कांहीं

---

१ देह. २ ह्यातीनयुगांत. ३ पूर्णता. ४ वीस. ५ मन.

झट्‌कन ॥ समय पांतल्या उशिर न लागे गिळिल काळ येउन गट्‌कन ॥ अमोल० ॥१॥ हत्ती-घोडे-महाल-खजिना कोणाची मंदिर माडी ॥ जाइल शेवटिं कांहिं न राहे काय धरुन याची गोडी ॥ तारुण्याच्या बळें घालशी विषयामधिं दाटुन फुगडी ॥ अहा रांडेच्या समय कठिण तो जेव्हां काळ येउनि रगडी ॥ कांता सुंदर रंभा जैशी तिची मनाला प्रीति गाढी ॥ जबरदस्त हा पाश तियेचा जशी कवाडा कुलुप-कडी ॥ जुंमा सुसरी ओंगळ खेचरि पाय धरुनि ओढी मट्‌कन ॥ जशी नंगि समशेर देहाचे तुकडे तुकडे करि खट्‌कन ॥ अमोल० ॥ २॥ सद्गुरु गोविंद नाथ निरंजन पदरेणु जेव्हां भरला ॥ आत्मा मी मग ब्रह्म सनातन शुद्धभाव तेव्हां फळला ॥ जिकडे पहातो तिकडे अवघा चराचरीं चिद्घन भरला ॥ देवनाथ

१ आल्यास. २ स्त्रीपुत्रधनादिकांत. ३ तरवार. ४ निरंतर. ५ चरवस्थिर.

ह्मणे चिंता आटली लवण[1] जळीं तेसा विरला[2] ॥ विरला- भरला भरूनि उरला तोचि मनीं गिळिला मट्कन ॥ देहस्थितिनें विदेह[3] आठवी जन्म-मरण जो घडि खट्कन् ॥ अमोलकाया जाइल वायां० ॥ ३ ॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत उत्तम, चटकदार शब्दांनीं प्राण्यास बोध केला आहे. पद्यरचना फारच सोपी असून दोन कडव्यांत मनास पटण्याजोगा बोध करून तिसऱ्या कडव्यांत ईश्वराचें वर्णन करून पद्य पुरें केलें. हरदासलोक ह्या चुटक्यावर कथेंत मोठा रंग भरून देतात.

---

गाणें. ३८ वें, फूल पारिजातकाचें.

एके समयीं नारद आले सत्वर अवनित[4]ळीं ॥ स्वर्गलोकींहुन पारिजातक फुल आणलें करमळीं ॥ नमुन विष्णुपद स्तवुन कुसुम[5] मग दिधलें हरिजवळी ॥ सकळ

---

१ मीठ. २ वितळला. ३ देहाची आस न धरणारा. ४ पृथ्वीतळावर. ५ फूल.

नगर घमघमिलें अभिनवपरिमळ कु-
सुमदळीं ॥ सजल जलद श्रीहरिनें पु-
जिली रुक्मिणि त्या सुमनीं ॥ १ ॥ मधु-
सूदन-वनमाळि करितसे लीलांकित अ-
वनी ॥ कनकरचित ही रम्य द्वारका म-
णिमंदिर भुवनीं ॥ अ० क० ॥ सखिजन
मग हें सत्यभामेला करिती श्रुत कर्णी ॥
मर्वेच जल नयनाशिं भरुनियां अंग
टाकिलें धरणीं ॥ मजहुन प्रियकर व
डिल सवत ही कशि झाली करणी ॥
जिव देइन मी आतां सख्यानो सुख
वाटे मरणीं ॥ कपटि शिरोमणि खरा कृ-
ष्ण हा नका येउं देउं सदनीं ॥ मधुसूद-
न० ॥ २ ॥ वर वर मजवर प्रीति दाखवी
अंतरिंचा कपटी ॥ स्वर्गसुमन सवतीस
समर्पुनि मज दिधली आपटी ॥ मम दै-
वन प्रतिकुळ जाहलें व्याकुळ तें दुपटी ॥
विविध विविध पहा शोक भामिनी भूमि-

१ मेघ. २ फुलानीं. ३ श्रीकृष्णा. ४ भुईवर.

शि निंदळ[1] आपटी ॥ करुणाकर-मनमोहन अकल्पित आले त्या भुवनीं॥ मधुसूदन० ॥३॥ हंसतनये मम प्राणवल्लभा[2] मजवर कां रुसली॥ रतिमंचक हा शून्य करुनियां अवनीवर दिसली॥ हळूच चतुर्भुज धरुनी आलिंगिन अंकावरी बसली॥ माझि गरज काय असेल ह्मणुनियां बोलुन धुसमुसली॥ तिला दिलें फुल आतां उतरली मर्जी मजवरली॥ मधुसूदन०॥४॥ हरि ह्मणे येवढ्यासुकें रुसावें इतुकें कां ह्मणुनी॥ तिला दिलें फुल तुझ्या अंगणीं तरुवर[3] लाविन आणुनी॥ अशि समजुन करितांच हंसली पदपंकज[4] प्रणुनी[5]॥ मग हरिनें घातली स्वहस्तें दृढ वेणी विणुनी॥ करुनि अलंकृत टिळक कुंकुमीं परिमार्जित वदनीं॥ मधुसूदन०॥५॥ करुनि ग-

१ मस्तक. २ सत्यभामा. ३ मोठा वृक्ष. ४ चरणकमल. ५ नमस्कार करून.

रुड मग सिद्ध स्वर्गिंहुनि पारिजातक आणिला ॥ कुशळपणें हळवार बंधनें अंगणिं रोंपविला[1] ॥ गर्व धरुनि मनिं सत्यभामा वदे सखि साजणिला ॥ श्रुत झाल्यावर हळुच श्रीहरि समजावि रुक्मिणिला ॥ तुझ्या अंगणीं फुलें वर्षती सांगिनलें पवनीं[2] ॥ मधुसूदन० ॥ ६ ॥ दिवस फुलांचे आल्यापासुनी रुक्मिणिच्या महालीं ॥ नित्य सदोदित फुलें वर्षती स्वानंदी झाली ॥ सत्यभामे घरिं पान्च-पंचविस अवशिष्टें राहिलीं ॥ एवढ्यावरून तिनें धरिलि बढाई शरिरिं नाहिं साहिली ॥ भरुनि करंडिंत सात-पान्च फुलें आली रुक्मिणिकडे घेउनी ॥ मधुसूदन० ॥ ७ ॥ जिकडे तिकडे पारिजातकमय अवघें अवतरले ॥ शेज फुलांची गजरे-हार-तुरे तबकामधिं भरले ॥ जिकडे पाही तिकडे पारिजातकसुमनांनीं[3] भरले ॥

1 लावविला. 2 वायूचें गर्वी. 3 फुलांनीं.

व[1]सन-पात्र-घर-दार सुवासिक पवे[2]नीं संचरले॥ अभिनव रचना पाहुन सुलज्जित झाली त्या भुवनीं॥ मधुसूदन०॥ ॥८॥ पुसे रुक्मिणी कोणिकडे आ[3]गमन झालें अकल्पित असें॥ तूं प्रियकर आवडती हरीची परि पुसतें सरसें॥ पूर्ण कृपा करि हरी तुजवरी नित तुज जवळी असे॥ मनिं वि[4]रली अति सत्यभामिका कांहिं न बोले-हंसे॥ खिन्नपणीं उत्तर ना देतां गेली नि[5]जभुवनीं॥ मधुसूदन०॥९॥ गर्व धरूनि मनिं आली परि हरी प्रसन्न रुक्मिणिला॥ स्वर्ग लोकिंचे दिव्य फुलांनीं सुरस महाल विणिला॥ रुसला मजवरि श्रीपुरुषोत्तम जरि प्रीतिनें पूजियला॥ पदोपदीं भगवान ठकवितो खरेंच हो मजला॥ ऐकुन हरिनें सत्कारिलि ती नेउन निजभुवनीं॥ म-

---

१ वस्त्र. २ वायूचे ठायीं. ३ येणें. ( तुला फूलच दिलें परंतु माझे दारीं झाड आणून लाविलें. सांगण्यास आली.) ४ विरघळली. ५ आपल्या मंदिरांत.

धुसूदन० ॥१०॥ ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत श्रीकृष्णाची लीला वर्णिली आहे. एके दिवशीं नारदानें स्वर्गाहून आणलेलें पारिजातकाचें फूल कृष्णास दिलें तें त्यानें घेऊन रुक्मिणीस दिलें. हें ऐकतांच सत्यभामेला मोठा क्रोध आला ह्मणून हरीनें तिच्या दारीं झाड आणून लाविलें इकडे रुक्मिणीला हें कळल्यावर तिची समजूत केली कीं. झाड कोठें कां असेना, तुझ्या अंगण्यांत फुलें पाडण्यास वायूला सांगितलें आहे. नंतर फुलांचे दिवस आल्यावर भामा गर्वानें दारच्या झाडाचीं पांच पंचवीस फुलें घेऊन रुक्मिणीस लाजविण्यास गेली. तों तेथें सेज. हार. तुरे. सर्वच त्या फुलांचे पाहून मनांत लाजली. अशा रीतीनें गर्व परिहार करून मग तिला कृष्णानें आनंदविली. ह्यांत सापत्नभावाची मौज, सत्यभामेचा रागावल्याचा आविर्भाव इत्यादि उत्तम वर्णिला आहे.

गाणें. ३९ वें. (राधा व तिचे सखीचा संवाद.)

( राधा सुखराणि मध्यें मिळाल्या आणिक

त्या गौळणी, या चालीवर )

राधा सखि संवादीं छेका[1] पन्हुति हे आयका. रसिक हो काय चतुर बायका ॥ ध्रु० ॥ अंबर[2] गत परि पयोधरांनें[3] रगडुनि पळतो दुरी. काय हा धीट ह्मणावा तरी ॥ तो नंदाचा मूल कायगे सांग कन्हय्या हरी, नव्हे गे मारुत[4] मेघोदरीं[5] ॥ सासू सासरा पति यां देखत अधरामृत माधुरी, घेतसे काय वदावी परी[6] ॥ तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी. नव्हे गे मधुपव्रज[7] हा करी ॥ पट विघटित कुचतटहि वसंतीं हळुच येउनी उरीं. सीतल स्पर्शें सुगंधित करी ॥ तो नंदाचा मूल कायगे सांग कन्हय्या हरी. नव्हे गे मलयज[8] करि चातुरी ॥

---

१ छेक-लटपट व अपन्हुति-लपविणें. २ आकाश. ३ मेघांतें. ४ वारा. ५ मेघमंडळांत. ६ रीति. ७ भ्रमर. ८ मलय पर्वता वरील वारा.

सुवर्ण[1] पाहुनि तनुवरि वंचेक[2] रातीं शिरतो घरीं, टाकितो हस्त तसा तनुवरी॥ तो नंदाचा मूल कायगे सांग कन्हय्या हरी. नव्हे हा दस्यु[3] समज अंतरीं॥ सुंदर रति जोगता मिळाला पति ही सुभगा[4] स्वरी, दुजीला असा मिळेल काय तरी॥ तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी, नव्हे गे रतिला मन्मथ[5] वरी॥ गुणवंत[6] कुचांवरि लोळे अति शोभला, तो कृष्णा काय? नव्हे हार कळेना तुला॥ बाई अंगमर्दनीं अति सुखकर वाटला, तो कृष्ण का? नव्हे कर[7] दूतीचा मला॥ मज सीतळ करितो श्रमि होऊनियां भूला, तो कृष्ण का? नव्हे व्यंजन[8] सुवंशांतला॥ चा० पहिली॥ यापरि निज संतोषें वर्णी पुसतां यदुनायका[10], लोपवी मुरलीच्या

१ चांगली कांती. २ ठक. ३ चोर ४ सौंदर्यवती. ५ मदन. ५ दोघांनीं गुंफलेला. ७ हस्त. ८ पंखा. ९ उत्तम पकृ-च्या जातींतला. १० कृष्णाला.

गायका ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत जरी शृंगारी शब्द दिसतआहेत तथापि हें गाणें द्व्यर्थी असून खुबीदार व अत्यंत मनोल्हादक आहे वाचलें असतां अर्थ स्पष्ट ध्यानांत येण्याकरितां खालीं बऱ्याच टिपा दिल्या आहेत- त्यांत राधेनें आपण उत्प्रेक्षा घेऊन सखीनें तो कृष्ण काय? असें विचारितांच त्याचा उलट अर्थ करून दाखवावा असा संवाद आहे.

---

गाणें. ४०वें, ( कृष्णाचा व सख्याचा संवाद. )

( चाल पहिली )

कंठीं लपटुनि सदा असावी सुभगा गुण[2]शालिनी- वाटते पुष्प[3]वती शो[4]भिनी ॥ वृष[5]भानूची सु[6]ता काय ती राधालिकुच स्त[7]नी?, नव्हे रे माळ आठवली मनीं ॥ अधरचुंबिनी वं[8]शासंभवा ला[9]लस मधुर ध्वनी, आव-

---

१ मुरली वाजविण त्याला- २ दोन्यांत ओंवलेली- ३ पुष्पानींयुक्त- ४ सुंदर- ५ राधेचा बाप- ६ कन्या- ७ लिंबासुतिस्तन- ८ उत्तम वेळूची- ९ स्त्री नांवधारी-

डते फारच हृदयांतुनीं ॥ वृषभानूची सुता० नव्हे रे मुरली जन मोहिनी ॥ विपरीता ही ननुवरि घेतां स्फदशा स्फरवदायिनी, लहानशी श्यामा गुणशालिनी ॥ वृषभानूची स्कता०. नव्हे रे मत्कंबल भोगिनी ॥ सरला ती सहृशा गोरी अतिशय संयोगिनी. येतसे करीं धरुनि जी यनीं ॥ वृषभानूची सुता०, नव्हे रे यष्टी सहचारिणी ॥ नखक्षतानें मृदु क्कणंती नव नव गुण रागिणी, धरावी वाटे कवटाळुनी ॥ वृषभानूची सुता०, नव्हे रे वीणा मृदुभाषिणी ॥ चाल ॥ वांकडी दिसे परि बहिरंतर निर्मळा, ती काय राधिका? नव्हे इंदुची कळा ॥ नीचा घट बसली धरुनी रसेच्या तळा, ती काय राधिका? नव्हे भुजंगी बळा ॥

---

१ उलट ( आंचळ्यां कडून ) २ चांगल्या आंचळ्यांनीं युक्त. ३ काळी. ४ लोंकरीच्या तंतूनीं युक्त. ५ माझी घोंगडी. ६ काठी. ७ बरोबर असणारी. ८ मंजुळ शब्द करणारी. ९ सर्पिणी.

किति मंजुळ वसंतीं रसाळ जीचा गळा, ती काय राधिका? नव्हे गड्या कोकिळा ॥ चाल पहिली ॥ यापरि हरि राधेला वर्णुन पुसतांक्षणि लोपवी, चतुर हा यदुकुळपंकज रवी ॥ श्री कृष्णाची सख्या सर्व ही छेकापन्हुति नवी, करी हा कविरायाहुनि कवी ॥ ॥

तात्पर्य– ह्या गाण्यांत कृष्ण कामातुरझाल्यासारख्या शृंगार शब्दांनीं आपल्या सख्याजवळ बोलत आहे. हें ही गाणें खुबीदार असून द्व्यर्थी आहे कृष्णाची उत्प्रेक्षा पाहून त्याच्या सख्यानें ती राधा काय? असें विचारितांच त्याचा उलट अर्थ करून दाखवावा असा संवाद आहे. ह्यांत कठीण शब्द असल्यामुळें टिपा देउन समजण्यासारखे केले आहेत.

---

गाणें. ४१ वें, जानकी लोपामुद्रा संवाद.

(किति रे अससी तूं निष्ठुर रामा- या चालीवर)

सांगे सति श्रीरामाची दारा, पतिप्रताप

सारा॥ सांगे० ॥ धृ० ॥ नेलें जें मातें लोपा-
मुद्रे, पळवुनि दैत्येंद्रें ॥ होतां श्रुत मग
त्या रामचंद्रें, परिसें गे भद्रे॥ दुःखाकुल
होऊनि शोकचि केला, भक्तीचा मू के-
ला ॥सांगे०॥ १॥ मग तो त्या कपिसीं शु-
द्धिस धाडी, पाहुनि धडाडी ॥ हृदय दैत्या
चें जणु त्या पाडी, उलथुनियां खालीं॥
भेटे मज कपि त्या अशोक वनिं जें, धिर
आला चित्ता॥सांगे०॥ २॥ मग तो मज
प्रियपति निरोप कळवी, मुद्रीका दावी॥
पाहून तिजला पतिस्पर्श सुख भावीं,
निज स्थिति त्या दावीं ॥ सांगे कपि रघु-
पति नेईल तुजला, न त्यजीं तूं धीरा॥
सांगे० ॥ ३ ॥ बोलून कपिवर मग ऐसें
मोडी, ती सुंदर झाडी ॥ येती राक्षस
त्यां दंडें ताडी, यमपुरीस धाडी ॥ कळ-
ली मात हि मग दशाननाला, तो धांवु-
नि आला ॥ सांगे०॥ ४॥ त्यासीं दंडुनि ही
लज्जितचि करी, वांकुल्या भारी॥दावुनि

जाळी तो लंका नगरी, मग सागर तीरीं॥ जाउनी भेटे तो रघुतिलकाला, कथि वृत्तांताला ॥ सांगे० ॥ ५ ॥ परिस्कनि वृत्ता ह्या सद्गदित होई, सांगू मी काई ॥ प्रीती मजवरि हो फारचि बाई, नसुचे त्या कांहीं॥ सिद्ध करुनी मग आशु दळभारा, ये सागर तीरा ॥ सांगे० ॥ ६ ॥ ह्मणती कपि सेना जाइल कैसी?, लंका नगरीसी ॥ जाणुन रघुपति मग माव कैसी, करि अपूर्व ऐसी ॥ बांधून सेतू मग जाय पैल तीरा, त्या लंका नगरा ॥ सांगे० ॥ ७ ॥ युद्धीं मारुनि त्या दशाननानें, सोडवि मग मातें॥ येतां परतुनि गे अयोध्येतें, देखें सेतूतें॥ नवल वाटे बहु ममचित्ताला, काय सांगू तुजला॥ सांगे० ॥ ८ ॥ लोपामुद्रा मग ह्मणे सीतेला, श्रम हा कां केला॥ सीते मम भर्ता जरि पाचारीला, असना तरि वहिला ॥ शोषून स्वचित्तःवि त्या रत्नागारा, देता मार्ग बरा ॥ सांगे० ॥ ९ ॥

कपि ने द्विजमूत्रा कधीं न शिवती, यास्त-
व मम पती ॥ सेतू बांधुनि घे दळ सांगातीं,
छेकापन्हुती ॥ दावी सति तो संवाद बरा,
गाती स्नरदारा ॥ सांगे सति श्रीरामाची
दारा, पतिप्रताप सारा ॥ १० ॥ ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत सीता व लोपामुद्रा याचा संवाद आहे. सीता लोपामुद्रेजवळ सांगतेकीं हे लोपामुद्रे रावणानें मला चोरून नेलें हें जेव्हां श्रीरामास समजलें तेव्हां, मजवर प्रीति करणारा असा रामचंद्र दुःखानें व्याप्त होऊन गेला नंतर माझ्या शुद्धि कारणें मारुतीस लंकेंत पाठविला तो माझी भेट घेण्याकरितां अशोकवनीं आला आणि रामचंद्रानें दिलेली मुद्रा व निरोप मला अर्पण केला व सांगितलें कीं मातोश्री सीते आपण कांहीं काळजी करूनये रामचंद्र थोड्याकाळांत आपणास मुक्त करून घेऊन जातील. असें सांगून तो रावणाच्या अशोक नामक आरामाचा नाश करावयास लागला तेव्हां मोठ मोठे राक्षस युद्धास आले त्यांस मारून सागरतीरीं रामचंद्राजवळ जाऊन सर्व वृत्तांत सांगितला तो रामानें

ऐकून सर्व वानरसेना व निजचाप सज्ज (तयार) क-
रून बाणरूपी सेतू करून लंका प्रवेश केला नंतर उभ-
यतांचें मोठें भयंकर युद्ध होऊन रामानें रावणाचा वध
केला व मला अयोध्येप्रत आणिली असें सीतेचें भा-
षण ऐकून लोपामुद्रा ह्मणाली कीं रामानें सेतू बांधण्या
ची उगाच खटपट केली जर माझ्या भर्त्यास (अग-
स्त्यऋषीस) सांगता तर त्यानें समुद्र शोषिला अ-
सता. सीता ह्मणाली वानर द्विजमूत्राला स्पर्श क-
रीत नाहींत ह्मणून सेतू बांधिला. अशी कथा आहे.

---

## गाणें. ४२ वें. रामचरित्र.

(लंकापुरी पुरी राज्यनगरी या चालीवर)

दशरथवंशीं. नाहीं संतान॥ ह्मणून मांडि-
लें अनुष्ठान॥ ऋष्यशृंगानें, करूनियां य-
ज्ञ॥ पायस[1] दिधलें मंत्रून॥ तिघी स्त्रियां-
नीं-केलें प्राशन॥ मग प्रसवल्या पुत्ररत्न
॥१॥ राम अवतरला, अवतरला अयोध्ये-
सी॥ आनंदले सर्व ऋषी॥ रामाचें नांव.

---

१ दूध.

स्मरा हो एकांतीं ॥ तुह्माला देईल तो मुक्ती ॥ अ० क० ॥ राम अवतरला, अवतरला अयोध्येस ॥ श्रुत हें झालें देवांस ॥ बंदिची व्यथा, सोसेना आह्मांस ॥ येइल करुणा रामास ॥ ह्मणूनी स्तविला, क्षीरसागरवासी ॥ दुष्ट मातला लंकेसी ॥ राम० ॥ २ ॥ विश्वामित्रानें, यज्ञ वनीं केला ॥ राक्षसांनीं विध्वंसीला[1] ॥ ह्मणोनियां राम, राम वनीं नेला ॥ आतां भय नाहीं आह्मांला ॥ वधिले राक्षस, यज्ञ सिद्धिस नेला ॥ गेले सीतेचे स्वयंवराला ॥ राम० ॥ ३ ॥ आणिली जानकी, आले अयोध्येसी ॥ आनंदले नगरवासी ॥ रामाचा माहेमा, वर्णावा कीती ॥ त्राटिकेस दिली मुक्ती ॥ गौतमललना[2], पादस्पर्शें सती ॥ झाली पूर्ववत् मूर्ती ॥ राम० ॥ ४ ॥ सोडविल देव, बंदीचे सर्व ॥ तो यशवंत रघुवीर दशरथ

---

१ नाशिला. २ गौतम ऋषीची स्त्री अहिल्या.

मनीं, आनंद थोर ॥ रामा बैसवी गादिवर ॥ करावें राज्य, राज्य साचार ॥ भक्तांसाठीं अवतार ॥ राम० ॥ ५ ॥ कौसल्या ह्मणे, रामा राज्य करीं ॥ सर्वत्रांना सौख्य देईं ॥ तेव्हां कैकयिनें, ऐकियलें श्रवणीं ॥ ह्मणे वर द्यावे ये क्षणीं ॥ राज्य भरतासी, राम वना धाडीं ॥ दशरथ खोंचला मनीं ॥ इतुकें ऐकूनी, रामवनीं गेला ॥ दशरथ धरणीवर पडला ॥ राम० ॥ ६ ॥ सागरीं सेतु, वानरानीं केला ॥ रामाचा महिमा वाढविला ॥ तारिल्या शिळा, गुहक उद्धरिला ॥ गंगेचे पार राम गेला ॥ वनीं वनवासा, चौद्दा वर्षे केला ॥ दशरथ स्वर्गावर गेला ॥ पंपासरोवरीं, सर्व क्रिया केल्या ॥ पित्याला स्वर्गीं स्वस्थविला ॥ राम० ॥ ७ ॥ राजा जनकांनीं, मिथिलेस पण केला ॥ रावणाचा मान गेला ॥ ह्मणूनि हा द्वेष, रामाशीं मांडिला ॥ मारीच सुवर्णमृग झाला ॥ भ्रमतां वनीं, सीतेनें देखियला ॥

कंचुकी द्यावी हो मंजला ॥ राम० ॥ ८ ॥ इतुकें ऐकूनी, चाप सिद्ध केला ॥ मृग मागें राम गेला ॥ हिंडतां वनीं, बहुत श्रमी झाला ॥ मृगानें घोर शब्द केला ॥ तेव्हां सीतेनें, श्रवणीं ऐकियला ॥ सौमित्रा राम वनीं पडला आहा ग सीते भय नाहिं रामाला ॥ न ऐके ह्मणे कपट भाव धरिला ॥ ओढुनी रेषा, सौमित्र वनीं गेला ॥ कर्मगति ओढवली तिजला ॥ राम० ॥ ९ ॥ दुष्ट रावण, वेष पालटिला ॥ भिक्षेस यति होउनी आला ॥ ह्मणे सीतेसी, भिक्षा द्यावि मजला ॥ स्कंधिं घेउन लंके गेला ॥ बिभीषण बंधु, सांगे रावणाला ॥ सीता द्यावी हो रामाला ॥ रामानें थोर, पराक्रम केला ॥ सागरीं सेतु बांधियला ॥ राम० ॥ १० ॥ बिभीषण भक्त, रामास शरण आला ॥ रुपेनें राज्य दिलें त्याला ॥

---

१ लक्ष्मणा. २ स्वामी.

वीर मारूती, अशोकवनीं गेला ॥ सीते
चे चरणीं लागला ॥ चला हो माते,रा-
ज्यीं बैसण्याला ॥ रामानें रावण वधि-
येला ॥ इतुकें ऐकूनी, आनंद थोर झा-
ला ॥ ह्मणे प्रतापि राम भला ॥ राम० ॥
॥ ११ ॥ भक्ति विरोधी, रावणानें केली ॥
रामाशीं मुक्ती मागितली ॥ वधिला राव-
ण, सीता सोडविली ॥ भक्तमंडळी आ-
नंदली ॥ अयोध्येचें राज्य, रामचंद्र
करी ॥ गंगेला रामचरणीं तारी ॥ रा-
म० ॥ १२ ॥ ॥

तात्पर्य— ह्या गाण्यांत बारा कडवीं आहेत. इतक्यांत बहुत करून सर्व रामायण आणलें आहे. ( रामजन्मापासून रावण वधापर्यंत कथा यांत आली आहे. ) यांत विशेष हाच कीं, थोडक्यांत सारांश वर्णीन असतां मुख्याच्या बहुतेक गोष्टी आणल्या आहेत. ज्यांनीं रामायण ऐकिलें आहे, त्यांला हें गाणें सूचिकेप्रमाणें होईल; ह्मणजे हें ह्मणत असतां सर्व कथा अनुक्रमानें डोळ्यांपुढें उभ्या

गहनील.

## आरती मंगलागौरीची.

नाहूनी माखुनी मोहनी बैसली। सर्व अलंकार आंगीं ल्याहिली कांचोळीपाटावाची। हिरेझोक नेसली॥ आरती मंगळागौरी॥ वससी काशिये पुरीं। तुझि माये भक्ति करीं॥ ओंवाळुं सोनियाताटीं। रत्नाचे दिवे। माणिकांच्या वाती। ओंवाळुं मोतींया जोती। भावें करूं आरती॥ आरती मंगळागौरी॥ १॥ साळीचे तांदुळ मुगांच्या डाळी। आळण खिचडी रांधिते नारी। आपुले पतिकारणे। सेवा करीते भारी॥ आरती मंगळा गौरी। वससी का०॥ २॥ रुप्याचे ताटांत गौराईला नैवेद्य खाजीया करंजीया। घृतलाडु मोदक साखरेचा पाक विस्तारीला ताटीं॥ आरती मंगळा०॥ ३॥ काशी खंडाहूनी आणिलें हें व्रत। ज्या नारी

पूजीती त्याही समस्त। पुजीती मनो-भावें। त्यांशीं प्रसन्न व्हावें॥ आरती०॥ ॥ ४ ॥ राजाची मुलगी ब्राह्मणानें वरिली। तिणें मंगळागोर काशीस पुजीली मनो-भावें। तीसीं प्रसन्न व्हावें॥ आरती०॥ ५॥ दुरुनी दिसतें अंबाबाईचें देऊळ। तुळई तूळवटावर वाहिली वीट॥ आरती०॥ ६॥ अंबाबाईचें आवाहन करूनी। विसर्जन विसरली। अंबा स्वयंभू झाली। देऊळ सो-नियाचें। आंत मूर्ति बरवी॥ आरती मं-गळागोरी। वससी काशिये पुरीं०॥ ७॥

समाप्त.



# मनोरंजक उखाणे.



१ आपण फिरली, बुबुळें फिरलीं. त्याच्याबरोबर घरेंही फिरलीं, इतकी गंमत कशानें झाली?

२ इख तसें तीख, त्याला कळकीसारखें पान, माझा उखाणा जिंकिल त्यालादेइन सोन्याची सह्राण.

३ इचमे कुपी बिचमे दाणा, माझा उखाणा जिंकिल तो चतुर शाहाणा.

४ इवलिशि पोर, राजाचा मुका घेते.

५ एवढासा पोर, राजाला ओणवा करितो.

६ एवढिशिसी खोपटी, नागोबा धोपटी.

७ एवढिशि मावशी बाई. देवा आधी नैवद्य खाई.

८ एवढिशि,पोर तिला काजळ कुंकू थोर

९ इवलिसें पोर, घर कसें राखतें.

१० एवढिशि बीबी. चुली पुढें उभी.

११ एवढेंसें सगळ्यांला डकलें.

१२ आधीं होतें साळी भोळी, मग त्यालें हिरवी चोळी, मग त्यालें तापता, जनलोक चाखता.

१३ आगदाणी, बागदाणी, बागेंत पडल्या चौघीज-
णी, हिरवा रंग कुंकुवावाणी.

१४ आठ आगंगणें, बारा पटांगणें, चार चौकडे, दो-
न आंकडे.

१५ आभाळा येवढी ह्मैस, तिची डोंगरा एवढी
कांस, तिला पिळी रामदास.

१६ उंच बायको ढिंगा जशी, पदर घेते टांचे पाशीं.

१७ काळी गाय, कांटे खाय, पाण्याला पाहून उभी
रहाय.

१८ घम घम घमाटा, विषाचा कांटा, सोन्याचीं देव-
ळें, रुप्याच्या घांटा.

१९ घांटावरून आला योगी, सात पासोड्या भोगी.

२० चिक चिक चिकलें, धोंड्यावर पिकलें, देखले,
पण नाहीं चाखलें.

२१ गुडगुड कुपींत, किल्ला कुडींत, काय तुझे म-
नांत सांग माझे कानांत.

२२ खालचीचें नांव काय?

२३ केशर कस्तुरी जीचे आंगा, त्या नारीचें नांव सांगा.

२४ वाजतें पण ऐकूं येत नाहीं.

२५ खण खण कुदळी, मण मण माती, राजाला सांपडलें माणिक मोतीं, राजानें दिलें राणीपाशीं, राणीनें ठेविलें पलंगाखालीं, हाय हाय, करूं काय, राजा मागेल देऊं काय.

२६ ठेंगणी कोंबडी खारें मांस, तिचीं पिलें शेंपन्नास.

२७ जुन्नरचा कापूस, वसईचें केळें, जासवंदीचें फूल, तिघांचें एकच मूळ.

२८ जटा नगरींचा राजा, बोटेश्वरीं आला, तळहातीं स्वार होऊन नखो नखीं प्राण गेला.

२९ जमिनी पडला, काना कोपरीं दडला, हातीं येत नाहीं हा चमत्कार घडला.

३० चंद्र सूर्य ह्मणे मी गाडा, घालीन पृथ्वीला वेढा, देवाचा केला घोडा, वर बसला वेडा.

३१ लाल छडी, मेदानमें खडी.

३२ बत्तीस चिरे त्यांत नागिण फिरे.

३३ पैशाचें लेणें, जन्मभर घेणें.

३४ दोन पायांचा पक्षी, फळ भक्षी, पाणी पीत नाहीं, दाणा खात नाहीं.

---

# उखाण्यांचीं उत्तरें.

१ गिरगिरमाश्याने.

२ आलें.

३ द्राक्ष

४ माशी.

५ विंचू-कांटा.

६ मृदंग.

७ माशी.

८ गुंज.

९ कुलूप.

१० फुंकणी.

११ नांव.

१२ आंबा.

१३ विडा.

१४ कुत्रीचे, वाघणीचे आणि शेळीचे सड.

१५ तेल्याचा घाणा.

१६ अबदागीर.

१७ वहाण.

१८ फणस.

१९ कांदा.

२० कुंकू.

२१ गरभार.

२२ सावली.

२३ गुंज.

२४ थंडी

२५ पावसाच्या पाण्याची गार

२६ ओला हरभरा.

२७ सांवरीचें झाड.

२८ डोकींतील ऊ.

२९ प्रकाश व काळोख.

३० बेल.

३१ ऊस.

३२ जीभ.

३३ कुंकू किंवा गोंदलेलें.

३४ अडकित्या.